# प्रस्तावना

श्री. पी. केशवदेव हे मल्याळम् कादंबरी–क्षेत्रातील महान लेखकांपैकी एक होत. त्यांच्या 'कण्णाडि' (दर्पण) या कादंबरीची भूमिका लिहिताना मला एकप्रकारे अभिमान वाटतो आहे, कारण केशवदेवांचा भूमिकेवर अथवा भूमिका लिहिणाऱ्यावर विश्वास नाही. त्यांच्या ग्रंथांचा कुणी भूमिका लेखक असेल, तर ते स्वतःच, असं त्यांचं ठाम मत आहे. टीका ही साहित्यसृजन करणाऱ्याला मदत करत नाही, हे केशवदेव मान्य करतात. म्हणूनच त्यांच्या या पुस्तकाची भूमिका लिहिताना मला अतिशय आनंद वाटतो आहे. परंतु एक गोष्ट स्पष्ट करायला हवी की, तकषीच्या 'एणिप्पडिकल', एम. टी. वासुदेवन नायरच्या, 'नालु केट्टु', पारप्पुरत्तुच्या 'अरनाषिकनेरम्' इत्यादी रचनांप्रमाणे केशवदेवांची 'कण्णाडि' रचना दुसऱ्या भाषेत अनुवाद करण्याच्या योग्यतेची नाही. यापेक्षा त्यांच्या 'अयलक्कार' किंवा 'ओडयिल निन्नु' या रचना चांगल्या ठरतील. या दोन रचना म्हणजे केशवदेवांच्या प्रतिभेच्या विकासाचे दोन टप्पे दाखवणाऱ्या कलाकृती आहेत.

'कण्णाडि' वाचून आपली त्यांच्या फक्त वाङ्मयोपासनेशीच ओळख होते. मात्र याचा अर्थ असा नव्हे की केशवदेवांचं व्यक्तिमत्व यात अजिबात दिसत नाही. माझ्या म्हणण्याचं तात्पर्य इतकंच की या कादंबरीत केशवदेवांच्या बहुमुखी प्रतिभेचा विकास पूर्णपणे आढळत नाही. काही सांकेतिक (तांत्रिक) कारणांमुळंच नॅशनल बुक ट्रस्ट इंडि . इतर दोन कृ.ी निवडण्यास असमर्थ ठरलं असावं, असं वाटतं.

सन १९०४ च्या ऑगस्टमध्ये जन्मलेले (हे रहस्य उघड केलं म्हणून केशवदेव रागावणार नाहीत असं वाटतं) नल्लेडत्तु पद्मनाभ पिल्ले केशव पिल्ले हेच नंतर 'केशवदेव' झाले. यामागे एक मनोरंजक गोष्ट आहे. वयाच्या अठराव्या वर्षी केशवदेवांनी आर्यसमाजात प्रवेश केला. समाजातील अनाचार व अनीतीच्या विरुद्ध शह देण्याच्या प्रबळ इच्छेमुळेच हा तरुण समाजात गेला असावा. आर्य समाजात प्रवेश घेतेवेळी त्या सभासदाचं नवं नाव ठेवण्याची प्रथा होती. त्याप्रमाणे संस्थेचे एक कार्यकर्ते ऋषीराम यांनी विचारलं–"आपल्याला 'देव' व्हायचंय का 'दास'?"

केशव पिल्लेने ताबडतोब उत्तर दिलं – "मला देव व्हायचंय, दास नाही."

केशवदेवांच्या जीवनावर व साहित्य साधनेवर प्रकाशझोत पाडणारी ही घटना असल्यामुळे मुद्दाम इथं सांगितली. केशवदेव 'विरोधा'चे किंवा प्रतिवादाचे अग्रणी आहेत. जे केशवदेव प्रथम केरळमधील कम्युनिस्ट पार्टीचे प्रचारक होते, तेच नंतर या पार्टीच्या प्रमुख विरोधकांपैकी एक बनले. एके काळी त्यांनी साहित्यिकांना 'अॅवार्ड' देण्याच्याविरुद्ध प्रचारतंत्र उघडलं होतं. पण नंतर त्यांनीच मध्यवर्ती साहित्य अॅकॅडमीचं बक्षीस स्वीकारलं. बहुतेक टीकेच्या संदर्भातील त्यांचं मतच तेवढं कायम राहिलं–ते टीकाकारांच्या विरुद्ध होते, आहेत आणि राहतील !

मल्याळम् कादंबरीच्या क्षेत्रात केशवदेवांचं स्थान कोणतं हे ठरवण्यापूर्वी त्या संदर्भात मल्याळी कादंबरीच्या इतिहासावर विचार केल्यास तो चुकीचा ठरू नये. कादंबरीचा इतिहास भारतात फक्त १७५ वर्षापूर्वीचा आहे, तर मल्याळीमध्ये जवळजवळ त्याच्या निम्म्याएवढा ! १८०१ साली बंगालीमध्ये प्रकाशित झालेली 'प्रतापादित्य चरित्रम्' ही पहिली भारतीय कादंबरी होय असं म्हणतात. ज्या गद्य-साहित्याचा जन्म बंगालमध्ये झाला होता ते हळूहळू हिंदी, उर्दू व मराठीमध्ये विकसित झालं, वाढलं. पण दक्षिणेत त्याचा प्रसार अतिशय मंदगतीने झाला. तामिळमध्ये बायबलचा अनुवाद १७९३ साली झाला होता. पण पहिली कादंबरी मात्र १८७९ साली लिहिली गेली. याचं प्रमुख कारण हेच की तामिळमध्ये पद्य साहित्याचा किंवा काव्याचा जबरदस्त प्रभाव होता. केरळमध्ये कादंबरीचा जन्म व्हायला थोडा जास्त वेळ लागला. परंतु १८८९ मध्ये जेव्हा ओय्यारत्तु चंतु मेनोनने 'इंदुलेखा' लिहिली तेव्हाच मल्याळीमध्ये गद्य-साहित्याच्या नवनिर्माणास सुरूवात झाली. डिझरेलीच्या 'बांटिटा टेंपल' वरून चंतु मेनोनला 'इंदुलेखा' लिहिण्याची प्रेरणा मिळाली आणि सर वॉल्टर स्कॉटच्या 'आयव्हॅन्यो'ने प्रभावित होऊन सी. व्ही. रामन पिल्ले यांनी 'मार्तंडवर्मा' लिहिले. या गोष्टीचा विशेष उल्लेख करावासा वाटतो. कादंबरी हा साहित्यप्रकार इंग्रजी साहित्याच्या प्रभावानेच मल्याळीत सुरू झाला. मल्याळीमध्ये कादंबरी, लघुकथा नाटक, निबंध, टीका, चरित्र, प्रवासवर्णन इत्यादि जेवढी म्हणून साहित्याची रूपे आहेत त्या सर्वांशी मिळते जुळते प्रकार इंग्रजीमध्येही आहेत. कादंबरीचं एक आणखी वैशिष्ठ्य आहे. इतर साहित्य प्रकारांसाठी मल्याळीत वेगवेगळे शब्द प्रचलित आहेत, पण कादंबरीसाठी वेगळा शब्द नाही. मल्याळी भाषेत कादंबरीला 'novel' (नॉव्हेल)च म्हणतात. 'आख्यायिका–' शब्द आता प्रचारात नाही.

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकात चंतु मेनोन आणि सी. व्ही. रामन पिल्ले यांनी या क्षेत्रात पाऊल टाकलं, पण त्यानंतरसुद्धा जवळजवळ तीस वर्षेपर्यंत कादंबरीची रचना झाली नाही. इंग्रजी साहित्याच्या उन्नतिगामी मार्गा-कडेच पहात रहाणाऱ्या केरळी लेखकांना विश्वसाहित्याच्या भूमीकडे आकर्षून घेण्याचं श्रेय श्री. ए. बालकृष्ण पिल्ले यांच्या 'केसरी'ला आहे हे सर्वविदितच आहे. त्यांनी युरोपियन वाङमयाचं विपुल ज्ञान संपादित केलं होतं आणि त्यामुळे ते तरुण लेखकांचे गुरू, मित्र आणि मार्गदर्शक झाले. 'केसरी'मुळेच पश्चिमे-कडील साहित्याच्या अनेक उत्कृष्ट रचनांची ओळख केरळवासियांना झाली होती. आणि त्यापासून प्रेरणा घेऊन साहित्य-निर्मितीच्या नवनव्या पद्धती आत्मसात् करण्याचं परमभाग्यही लेखकांना लाभलं, हे नि:संशय !

मल्याळी वाङमयात बदल होण्याचं याखेरीज आणखीही एक कारण आहे. १९३७ सालाच्या अगदी सुरूवातीला भारतात राष्ट्रीय नेत्यांनी स्वदेशीचं आंदो-लन सुरू केलं होतं. तरुण लेखक डाव्या गटाच्या विचारपद्धतीकडे—विशेषेकरून मार्क्सवाद आणि कम्युनिझम विचारपद्धतीकडे आकर्षित होऊ लागले. ह्यांच्या आधीच्या पिढीची समस्या मुख्यत्वेकरून पाश्चात्य-पौर्वात्त्य संघर्षावर आधार-लेली होती. म्हणजेच शतकानुशतके चालत असलेल्या आचार संहिता व नवी पश्चिमेकडील संस्कृती यातील संघर्ष. त्या लोकांमध्ये मध्यमवर्गाचा स्वप्नाळू दृष्टीकोन आणि आदर्श प्रेम होतं. परंतु स्वत:ला 'प्रगतीवादी' म्हणविणारे नवे लेखक समाजातील दारिद्रय, आपत्ती, शोषण, पिळवणूक इत्यादि गोष्टींकडे अधिक लक्ष देऊ लागले व यापासून प्रेरणा घेऊन लिहू लागले. या परिवर्तन-प्रक्रियेचं नेतृत्व करणाऱ्यांच्या अग्रभागी केशवदेव होते.

श्रीमंतांच्या आणि मध्यमवर्गीयांच्या ठराविक चाकोरीतून वाङमयाला बाहेर काढून गरीबांच्या झोपडीत रहाण्याच्या क्रियेचं केशवदेवांनी नेतृत्व केलं, या गोष्टीचा केशवदेवांना अभिमान वाटतो. त्यांचा विश्वास आहे की त्यांनीच सर्व-प्रथम मल्याळी साहित्यात सामूहिक चिंतनाची भर घालून त्याला गौरव मिळवून दिला होता. त्याचप्रमाणे त्यामध्ये आर्थिक विषमतेचं चित्र त्यांनी रेखाटलं होतं. दुसऱ्या कुणीही त्यांच्याप्रमाणे इतक्या व्यापक दृष्टीने जीवनाच्या सर्व क्षेत्रांचं वर्णन केलेलं नाही, असं त्यांचं ठाम मत आहे. बरोबर आहे—जवळजवळ पंचवीस कादंबऱ्या, पंधरा कथासंग्रह, अकरा नाटके, सात एकांकी संग्रह, चार आत्मकथा—

वजा ग्रंथ, एक गद्य कविता - संग्रह, एक टीकाग्रंथ - इतकं विविध व विपुल लिखाण करणारा बहुमुखी प्रतिभेचा लेखक मल्याळीतच नाही तर दुसऱ्या भाषेतही विरळाच सापडेल. केशवदेवांनी वाङ्मयाचा फक्त एकच प्रांत हाताळला नाही व तो म्हणजे कवितेचा !

मल्याळीमध्ये प्रथम 'प्रोलिटेरियन' साहित्यिक म्हणून केशवदेवांचंच नाव घ्यावं लागेल. अर्थात याठिकाणी कलाकार म्हणून अधिक प्रसिद्ध असलेल्या श्री तकषि शिवशंकर पिल्ले यांच्याबद्दल कोणतीही अपमानास्पद भावना दर्शवायची नाही. माझ्या म्हणण्याचा अर्थ एवढाच की केशवदेवांनीच 'सोशालिस्ट' संस्थांना एकत्रित करून त्यांचं पुढारीपण स्वीकारलं होतं, त्यांच्याकडून प्रेरणा घेऊन लिहिलं होतं. श्रीमंत गरीब, त्यांच्यातील सामाजिक संबंध व अटळ संघर्ष या दोन्हीस ऐतिहासिक पार्श्वभूमी दिली होती आणि त्याचं सहेतूक चित्रण केलं होतं. केशवदेव हे केरळातील 'ट्रेड युनियन'च्या सुरुवातीच्या नेत्यांपैकीच एक असल्यामुळे कोचीन आणि आलप्पुषामधील मजुरांना ते एके ठिकाणी संघटित करू शकले आणि त्यांच्यामध्ये स्वत: एक मजुराप्रमाणे राहिल्यानेच त्यांची परिस्थिती समजावून घेऊ शकले. तकषि शिवशंकर पिल्ले यांच्या वाङ्मयात त्यांच्या वातावरणाचा कलात्मक आविष्कार आपल्याला पहायला मिळतो, तर केशवदेवांच्या साहित्यात त्याचं सामूहिक प्रतिबिंब. स्वत:च्या अनुभवाला व दृष्टीकोनाला कलात्मक स्वरूप देणं तकषि यांना जास्त आवडतं, तर केशवदेव त्यांच्या सामूहिक भावनांवर भर देतात.

माझी समस्या 'साहित्य' नसून 'जीवन' ही आहे, याच सिद्धांताचा केशवदेवांनी अंगिकार केला. एवढेच नव्हे तर संधी मिळताच त्यांनी या सिद्धांताची जाहीर घोषणाही केली आहे. 'कण्णाडि'च्या भूमिकेत त्यांनी लिहिलं आहे—

"साहित्य निर्माण करण्याच्या उद्देशाने अगर साहित्यिक व्हावं या इच्छेने मी लिहित नाही. माझ्यापुढे साहित्य हे कधीही 'प्रश्न' या स्वरूपात राहिलं नाही. माझ्यासमोर जर कोणता प्रश्न असेल तर तो म्हणजे जीवनाचा. मी जीवनाचा टीकाकार व भाष्यकार आहे म्हणून जेव्हा मी माझ्या टीका आणि व्याख्या आपल्यासमोर मांडतो, तेव्हा तेच साहित्य या स्वरूपात दिसतं." केशवदेवांशी जेव्हा प्रत्यक्ष गाठ पडली तेव्हाही त्यांनी याच गोष्टीचा पुनरुच्चार केला होता

"साहित्य माझा प्रश्न नाही. जीवन माझा प्रश्न आहे. जीवनातील सुखं

वाढवणं आणि दु:ख कमी करणं हेच माझं अंतिम ध्यय आहे. यासाठी मी लिहितो, भाषणंही देतो. अशातऱ्हेने मी एक हेतुपूर्वक लिहिणारा साहित्यिक आहे. समाजाशी असलेला माझा संबंधच मला लिहिण्याची प्रेरणा देतो.

केशवदेव पूर्णपणे एक हेतुपूर्वक लिहिणारे साहित्यिक आहेत. सामाजिक बदलांच्या संदर्भानुसार ते कधी लिहित नाहीत. तसं पाहिलं तर त्यांचं लेखन हे साध्यप्राप्तीच्या अनेक साधनांपैकी एक होय. जीवनरूपी प्रश्न सोडवण्यासाठीच ते व्याख्यानं देतात, लिहितात, सामाजिक कार्यकर्ता होतात आणि स्वत: जीवन व्यतीत करतात. त्यांना कोणत्याही साहित्यप्रकाराबद्दल विशेष स्नेह आहे असं वाटत नाही. विचार स्पष्ट करण्यासाठी जो साहित्यप्रकार त्यांना चांगला वाटतो तोच ते अंगिकारतात. नाटक, कादंबरी, कथा, एकांकी, निबंध या सर्वच साहित्य –प्रकारात ते निष्णात आहेत. नक्की साध्य कोणतं, ह्याची मनातील कल्पना दृढमूल झाल्यामुळे म्हणा, पण ते आपला पक्षपातीपणा कधी लपवून ठेवत नाहीत. कलापूर्ण व्यंजनेच्या जागी प्रकोपनात्मक प्रतिपादन किंवा वाच्यलक्ष्य-प्राप्तीसाठी जर प्रयोजनपद वापरायला लागलं तरी ते मागेपुढे पहात नाहीत. जीवनावर गाढ प्रेम करणाऱ्या या मनुष्याने नेहमी प्रेमाची तीक्ष्णता व आपला प्रतिपादनातील आवेश दाखवला आहे, ही आश्चर्याची गोष्ट आहे.

केशवदेवांनी गांजलेल्या पीडलेल्या लोकांचं समर्थन करून साहित्य लेखनास प्रारंभ केला त्यावेळी 'वास्तववादा'चं तंत्र अवलंबिलं होतं. मल्याळीत वास्तव-वादाच्या संस्थापकांमध्ये तेच अग्रभागी होते. यानंतर जे 'प्रगतीवादी साहित्य' निर्माण झालं त्याचे संस्थापक तकषि आणि देव होते. जेव्हा मी असं विधान करतो, तेव्हाही पोनकुन्नम् वक्की, वैक्कम् मुहम्मद बषीर, एम. पी. पोल इत्यादी लेखकांचं मला विस्मरण झालेलं नसतं. माझं तात्पर्य इतकंच की सामाजिक अन्यायाविरुद्ध जनतेला एकवटण्याचं जे आंदोलन झालं त्यांच्यापुढे झेंडा धरून उभे रहाणारे देवच होते.

मी आताच असं म्हटलं की केशवदेव पक्के वास्तववादी आणि प्रगतिवादी होते. पण ते तेवढेच पक्के रोमँटिसिस्ट होते, ही गोष्टही तितकीच खरी आहे. उदाहरणासाठी त्यांची प्रसिद्ध कादंबरी 'ओडयिल निन्नु' (घाण पाण्याच्या नलिके-तून–गटारातून) –चं घ्या ना ! ही १९४२ साली लिहिली गेली. यामध्ये पप्पू (पद्मनाभन) नावाच्या रिक्षावाल्याच्या अपरिमित त्यागाची व माणुसकीची गोष्ट

आहे. कष्ट आणि यातनेच्या खोल दरीत तडफडणारा प्राणिमात्रही उदात्त मानवी विकार आत्मसात करू शकतो—हाच संदेश देवांनी या रचनेद्वारे दिला आहे. या संदेशाचा प्रगल्भ आविष्कार करून दाखवण्यात ते यशस्वी झाले आहेत. पण त्यांच्या मनात दडलेला वास्तववादी साहित्यिक अजिबात डोकं वर काढत नाही असं मात्र नाही. सांडपाण्याच्या गटारातून पप्पू ज्या गरीब मुलीचा उद्धार करतो ती एका श्रीमंताला आपला प्रियकर करते—यात पुन्हा जुन्या सिंडरेला कथेचं प्रतिबिंब दिसत नाही काय ? अशारीतीने पप्पूचं चरित्र निर्माण करतानाही अतिभावुकतेचा कटु रंग यावर दिला गेला आहे. खऱ्या आत्माभिमानाचं प्रतीक म्हणून झळाळून उठणारा पप्पू म्हणजे प्रत्यक्ष आदर्शवादच होय, तो गल्लीबोळातून हिंडणारा कुणी सामान्य रिक्षावाला नाही. खरं पाहता, केशवदेवांनी पप्पूला जीवनाच्या वास्तवतेच्या गलिच्छ ओढयातून काढून त्याचं आदर्शबोधाच्या उच्च पातळीवर संक्रमण केलं आहे. फक्त 'ओडयिल निन्नु' या कादंबरीतच नव्हे, तर 'एका सुंदरीची गोष्ट', 'स्वप्न' इत्यादी रचनांमध्येही भावुकतेची सीमा ओलांडलेली दिसते. कदाचित हा केशवदेवांच्या मानसिक अभिलाषेचा वा न अनुभवलेल्या जीवनाचाही आविष्कार असेल. ते काही असो, पण केशवदेवांच्या रचनांमध्ये आढळणारी ही अतिभावुकता त्यांच्या प्रबळ वास्तवताबोधावर दाट सावली पाडते, हे मात्र मान्य करावं लागतं.

देव असं आग्रहपूर्वक प्रतिपादन करतात की ते प्रतिगामित्वाच्या विरुद्ध लढणारे आहेत. हे बरोबरच आहे. पण त्याचबरोबर ते जुन्या शैलीचे आदर्शवादीही आहेत. त्यांचा नेहमी आग्रह असतो की त्यांची आवडती चरित्रं पूर्णपणे सदाचारवादी असावीत. पप्पूची सन्मार्गनिष्ठा त्याच्या संपूर्ण आयुष्यभर पसरली आहे.

'एका सुंदरीची गोष्ट' मधील भवानी अशाच तऱ्हेची आहे. आपल्या चारित्र्याला एवढासुद्धा धक्का न लावता ती समाजाच्या उच्च पातळीपर्यंत पोचते. देवांची प्रमुख कथा 'रौडी' (बदमाश) यामध्येही तो गुंडांमधला राजकुमार असतो, असं म्हटल्यास चूक ठरू नये. ज्या क्षणी तो हिंसेचं प्रतीक असलेला सुरा फेकून देतो, त्या क्षणापासून तो जीवनाशी, धर्मबोधाशी मिळतं जुळतं घ्यायला तयार होतो.

ही गोष्ट खरी आहे की वास्तवताबोध व धर्मबोध यांमधील संघर्षामुळे देवांच्या अनेक रचना कलेच्या दृष्टीने गौण झाल्या आहेत. देव आणि तकषींमध्ये हेच अंतर आहे. तकषि फक्त 'चेम्मीन' कादंबरीतच एका प्रेमी मनुष्याच्या स्वरूपात

दिसतात. बाकी बहुतेक सर्व रचनांमध्ये ते देवांपेक्षाही अधिक वास्तववादी आहेत केशवदेवांच्याऐवजी तकषींनी 'ओडयिल निन्नु' लिहिली आहे अशी क्षणभर कल्पना केली, तर हा फरक लक्षात येईल. जर पप्पू तकषींचा मानस-पुत्र असता तर जीवनाच्या भयंकर न्यायाच्या वश होऊन आपल्या मानलेल्या मुलीकडे लाचारी पत्करून त्यानं पोट भरलं असतं किंवा भिकारी होऊन बोळाबोळातून फिरत झिजून गेला असता. तकषींची ती 'ओडयिल निन्नु' कदाचित कलेच्या दृष्टीने अधिक चांगली वठली असती पण त्यांना देवांच्या रचनेतला संगठित भाव मिळाला नसता आणि साधारण माणसाची सुखं वाढवून व दुःख कमी करून आत्मविश्वास निर्माण करण्यातही तो यशस्वी झाला नसता. देवांचा लक्ष्यबोध व तकषींचा कलाबोध यातील फरक इथे चांगला स्पष्ट होतो.

स्थूलमानाने केशवदेवांच्या रचनांचे दोन विभाग करता येतील. रोमँटिक कादंबरी व वास्तववादी कादंबरी. पण हे विभाजनही चुकीचं वाटतं, कारण काही कादंबऱ्यांमध्ये दोन्ही प्रकारच्या तंत्रांचं मिश्रण आढळतं. पहिल्या विभागात 'ओडयिल निन्नु', 'एका सुंदरीची गोष्ट', 'स्वप्न', 'प्रेममूर्ख' इत्यादी अंतर्भूत होतात तर दुसऱ्या विभागामध्ये 'अयलक्कार' (शेजारी), 'कण्णाडि', 'अधिकार', 'कुणासाठी', 'कुणीकडे' इत्यादी. केशवदेवांनी क्रांतिकारक व प्रचारात्मक लेख लिहून साहित्य–जीवनास प्रारंभ केला होता, म्हणून वाचकांशी प्रत्यक्ष संपर्क साधणं त्यांना आवडतं.

'कुणासाठी', 'कुणीकडे' यासारख्या कादंबऱ्यांतील प्रतीकवादाच्या उपयोगामुळे वाचकांच्या मनावर चांगला प्रभाव होतो. प्रचलित, साध्या शद्बांनी मनुष्याच्या मनात वादळ निर्माण करणारी देवांची शैली ही दुसऱ्यांच्या मनांत ईर्ष्याभाव निर्माण करते. जीवनाच्या सामान्य प्रसंगांचं ते जेव्हा अगदी मोजक्या शब्दांत वर्णन करू लागतात तेव्हा मंत्रमुग्ध व्हायला होतं. आणखी एक प्रशंसनीय बाब म्हणजे ते जीवनाच्या काव्यसौंदर्याचा साक्षात्कार घडवण्यात वाकबगार आहेत. पण त्यांच्या जीवनकाव्याचं प्रणयगीतापेक्षा प्रयाणगीताशी अधिक साधर्म्य वाटतं.

केशवदेव उच्च सामूहिक बोधाने प्रेरित झालेले लेखक आहेत. तात्कालिक सामाजिक व राजनीतिक गोष्टींचं चित्रण करतेवेळी त्या संबंधीचं स्वतःचं मत प्रकट करण्याबाबत ते कोणतीही भीड बाळगत नाहीत. परंतु देव स्वतःच जणू

सामाजिक, राजनीतिक आंदोलनाचं एक जगच आहेत, त्यामुळे यात आश्चर्य वाटत नाही. ही आपली शक्ती असं ते मानतात. सामाजिक फेरबदल घडवणाऱ्याच्या स्वरूपातली त्यांची ही शक्ती आहे. पण कलाकाराच्या स्वरूपात हीच शक्ती दोष बनते, त्याचं काय ? उदाहरणार्थ, 'अयलक्कार' (शेजारी) घ्या. १९६३ साली लिहिलेल्या या कादंबरीला साहित्य अॅकॅडमीचं बक्षीस मिळालं आहे. ही कादंबरी म्हणजे केरळच्या सामाजिक बदलाचा इतिहास खोलवरपणे चित्रित केलेल्या प्रयत्नांचंच फळ होय. यामध्ये आपल्याला सामाजिक, आर्थिक व मानसशास्त्रीय संघर्षातून विकास करणाऱ्या केरळचं हृदयंगम चित्र पहायला मिळतं. निर्दोष ऐतिहासिक वेध, अचूक वास्तवताबोध, सखोल दर्शन व उच्च नीतीबोध या गोष्टींनी या रचनेत देवांना हातभार लावलेला आहे. परंतु जेव्हा या कृतीतील प्रत्येक चरित्र आपण वेगवेगळं काढून पाहू लागतो, तेव्हा ही सर्व चरित्रं म्हणजे व्यक्तीपेक्षा समाजाचे वा एखाद्या विभागाचे किंवा एखाद्या संदर्भाचे प्रतिनिधी आहेत असंच दृष्टोत्पत्तीस येतं. ही चरित्रं समाजाचं प्रतिनिधित्व अधिक करतात, रक्तमांसयुक्त मनुष्यपण, संकुचित दृष्टी व मतभिन्नता यांचं मिश्रण त्यात कमी दिसतं म्हणूनच 'व्यक्ती' या स्वरूपात पाहिल्यास त्यांच्यामध्ये एवढी उंची आपणास आढळणार नाही. नित्याच्या जीवनातून जरी त्यांची पात्रं निर्माण झाली असली तरीही त्यांची संकुचित वृत्ती दूर करून व साधर्म्य दाखवून केशवदेव पात्रांची निर्मिती करतात. ही चरित्रं मुख्यत: आशयाचं प्रतिनिधित्व करतात. दुसऱ्या शब्दांत सांगायचं तर ही चरित्रं वास्तव जीवनाची प्रतीकं तितकीशी नाहीत.

खरे पाहता, केशवदेवांच्या रचना या त्यांच्या मनातील रोमॅंटिसिझम आणि वास्तववाद यामधील संघर्षाच्या रंगवेदी आहेत. त्या संघर्षाचं प्रमाण कमी जास्त असू शकेल. आज देव जवळजवळ सत्तर वर्षांचे झाले आहेत. तरीही त्यांच्यामधला क्रांतिकारी कलावंत त्यांना स्वस्थ बसू देत नाही. जिथे शब्दावलीच्या कोमल अनुसरणाने मृदुतरल संगीतधारा उत्पन्न होते, तिथे देव वीरत्व आणि उत्साह निर्माण करणारी कठोर-पदावलींनी युक्त युद्धगीतं गाऊ इच्छितात. तीक्ष्ण लक्ष्यबोधामुळे ते रंगभूमीमागे बसून पात्रांवर नियंत्रण ठेवण्याच्या ऐवजी त्यांच्याबरोबरच रंगमंचावर येऊ पाहतात किंवा पात्रांच्या मुखातून स्वत: संवाद बोलण्याची इच्छा त्यांना होते. कोणतेही एक पात्र त्यांचं पूर्णपणे प्रतिनिधित्व

करीत नाही, हे जरी खरं असलं, तरीही अनेक पात्रांमध्ये ते डोकावताना दिसतात (हेही तितकंच खरं.) 'अधिकार'चा रामू, 'उलक्का' (उखळ) चा कोच्चयप्पन, 'कण्णाडि'चा हवा, 'ओडयिल निन्नु' मधला पप्पू—या सर्वांमध्ये केशवदेव दिसतात. सामान्यत: श्रेष्ठ कलावंतांची चरित्रं त्या त्या कलावंताचं प्रतिनिधित्व करतात, परंतु केशवदेव मात्र नेहमी आपल्या पात्रांना काबूत ठेवतात.

सामाजिक परिवर्तनापेक्षा राजनीतिक समीक्षेला प्रमुख स्थान ज्यात दिलं आहे ती केशवदेवांची प्रसिद्ध कृती म्हणजे– 'कुणासाठी.' १९५० साली लिहिलेल्या या कादंबरीचे वास्तविकपणे दोन भाग पडतात– एक त्याची भूमिका आणि दुसरा म्हणजे खुद्द कादंबरी. कृष्णचैतन्यांसारखे टीकाकार म्हणतात की कलागुणांनी युक्त असलेल्या भूमिकेपासून मिळणारं यश हे ही कादंबरी या भूमिकेबरोबर प्रकाशित केल्यानं संपुष्टात आलं आहे. कारण कादंबरी भूमिकेत मांडलेल्या सिद्धांतांचंच कथारूप आहे. कम्युनिस्ट पक्षाचे सभासद ही यातील प्रमुख चरित्रं आहेत. 'कुणासाठी' मध्ये देवांनी एक असा नेता रंगवला आहे, जो कठोर-हृदयी आणि सत्तालोलुप तर आहेच याचबरोबर तो वैयक्तिक स्वार्थासाठी पक्षाला आपल्या कह्यात ठेवतो आणि पक्षाची धूळधाण करतो. स्टालिनच्या काळी रशियात अस्तित्वात असलेल्या 'शुद्धीकरण-प्रक्रिये'पासून लेखकाने प्रेरणा घेतली. अर्थात् तिच्यातील नाटयपूर्णता अंगिकारणं एवढाच देवांचा हेतू होता. परंतु कादंबरी लिहितेवेळी अमितावेशामुळे त्यांचा स्वत:वरील संयम नष्ट झाला असेल आणि कलागुणांच्या साध्यपूर्तीपेक्षा राजनीतिक हेतू प्रमुख ठरला असेल. 'कुणासाठी' कादंबरी वाचताना असं वाटतं, जणू काही एखाद्या सर्कशीतला रिंगमास्टर आपल्या प्राण्यांसमवेत रंगमंचावर येऊन रंगीत तालीम करतो आहे आणि त्या आधी तालमीबद्दल लांबलचक भाषण देतो आहे.

'दर्पण' ही रचनासुद्धा केशवदेवांच्या राष्ट्रीय उद्धार करू पाहणाऱ्या अपत्यांपैकी एक होय. म्हणूनच या संदर्भात मी 'कुणासाठी' बद्दलही विस्तारपूर्वक सांगितलं. "अखिल जगतातील मजुरांनो, संघटित व्हा, तुम्ही ज्या बेडीत बांधले गेले आहात, त्याखेरीज तुम्हाला नष्ट करणारं दुसरं काहीही नाही" ह्या मार्क्सच्या संदेशाचा मोठ्याने पुनरुच्चार करीत, एका सुंदर समता असलेल्या सामाजिक रचनेचं स्वप्न पहात आणि मृत्यूचीसुद्धा पर्वा न करता ह्या तलवारीच्या धारेवर लेखक जेव्हा चालत होता, त्या वेळच्या त्याच्या स्मृतींचं सार म्हणजेच 'दर्पण'

होय. विसाव्या शतकाच्या चौथ्या दशकात 'दर्पण' लिहिली गेली. जर त्या काळात किंवा त्याच्या जवळपास ही कादंबरी प्रकाशित झाली असती, तर ती अत्यंत क्रांति-कारक ठरली असती आणि कदाचित 'देशद्रोहा'च्या गुन्ह्याखाली सरकारने हिच्यावर प्रकाशनबंदीही आणली असती. परंतु ती १९६१ मध्ये प्रकाशित झाली (कदाचित लिहिलीही गेली?) आणि यामुळंच हिचं ऐतिहासिक महत्त्वही नाहीसं झालं. इतिहासाच्या विशिष्ठ काळाचा कथारूपातील पुनराविष्कार साधारणपणे भूतकाळापासून प्रेरणा देणारा किंवा वर्तमानकाळातील प्रयत्नांना योग्य रीतीने व्यक्त करणारा ठरतो. १९३८ साली आलप्पुष शहरात जे भयंकर हत्याकांड झालं होतं, त्या वेळच्या घटनांना साकाररूप 'दर्पण' मध्ये केशवदेवांनी दिलेलं आहे. ह्या प्रख्यात घटनांचं वर्णन करतेवेळी देवांमध्ये जो उत्साह दिसतो, तो वाचकांमध्ये दिसत नाही, याचं कारण काळातील अंतर (gap). १९३०-१९४० या दरम्यान जर कादंबरी लिहिली गेली असती, तर ऐतिहासिक कर्तव्य पूर्ण झालं असतं, कदाचित ती यशस्वीही ठरली असती. इतकंच नाही तर, समकालीन (तत्कालीन) जीवनाशी किंवा भावी जीवनाशी हिचा संबंध जोडला गेला असता, तर हिची रुची अधिकच वाढली असती. परंतु देव १९३८–३९ सालापाशीच थबकतात. म्हणूनच ही 'अवेळी लिहिलेली रचना' आहे, असंच 'दर्पण' बाबत म्हणावं लागतं.

'दर्पण' मध्ये स्मृतींनी उजाळा दिलेला आहे, असं देव म्हणतात. प्रमुख पात्र 'हवा' सुद्धा त्यांचंच प्रतिनिधित्व करतो. देवांच्या वास्तवताबोधाचा पुरावा म्हणून एका मर्यादेपर्यंत या रचनेचा उल्लेख करता येईल. साधारण मजूरजीवनाशी अगदी जवळून संबंध आल्यामुळे त्यांचं जीवन साकार करणं हे सोपं झालं आहे. परंतु चौदा महिने इतक्या कालावधीपर्यंत ही रचना निर्माण होत होती, तरीसुद्धा 'दर्पण' मध्ये व्यापकपणा, विशाल दृष्टी दिसत नाही. सामान्य (माणसाचं) जीवनाचं चित्रण करतेवेळी या कादंबरीतही देवांचं सहजकौशल्य कधीकधी दिसतं, परंतु ते तितकंसं झळाळत नाही. व्यक्ती या स्वरूपात कोच्चुरामन व गोरी नीलीचा जेवढा प्रभाव पडतो, तेवढा दुसऱ्या पिढीतील पात्रांचा पडत नाही. अर्थात् यालाही काही कारणं आहेत. कोच्चुरामन आणि नीली या दोन्ही व्यक्ती आहेत, तर अंतोणि आणि रोक्कि संदर्भाचे——अवधान ठेवून केलेल्या बदलांचे व अविवेकी वागण्याचे——प्रतिनिधी आहेत.

'हवा'बद्दल सांगायचं झालं तर देवांच्या सीमेपलीकडे झेप घेणाऱ्या रोमँटिसिझममुळे ह्या पात्राबद्दल अतिशय अविश्वासच निर्माण होतो, एवढंच म्हणावं लागेल. नाव-गाव नसलेला सर्वत्र संचार करणारा आणि सगळ्या ठिकाणी सारखा प्रकट होणारा 'हवा' कदाचित मुलांचं मनोरंजन करेल. 'हवा' नावामध्ये मात्र हास्याची लकेर आहे. रक्त आणि घाम गाळणाऱ्या, शोषल्या जाणाऱ्या जनतेमध्ये अशात-हेचं निराळंच पात्र घुसडल्यामुळे कादंबरीच्या वातावरणावर, विश्वसनीयतेवर आणि विकारात्मक भागांवर मोठाच आघात झाला आहे. याऐवजी देवांनी जर विश्वासाने या भूतलावर जीवन जगणाऱ्या मजूरनेत्याचं चित्र रंगवलं असतं, तर कदाचित 'दर्पण' त्या काळचा दर्पण निश्चित झाला असता. आजच्या संदर्भात 'हवा' केवळ 'कॅरिकेचर' होऊन राहिला आहे– जिवंत पात्रांमध्ये घुसडलेलं विनोदी पात्र ! आणि 'दर्पण' निव्वळ धूसर आरसा !

इतकं असूनही केशवदेव केरळातील मजूर चळवळीचा प्रारंभीचा ऱ्हस्व, तरीही खऱ्या स्वरूपातील इतिहास रंगवण्यात सफल झाले आहेत, असं म्हणण्यास काही प्रत्यवाय नाही. मालकाला परमेश्वर मानणाऱ्या मजुरांमध्ये हळूहळू जागृती होणं आणि त्यांचं संघटित होणं एका 'चांगल्या उद्या'ची वाट पहाणं — ह्या सर्व गोष्टी सहजपणे परंतु आकर्षक स्वरूपात देवांनी उभ्या केल्या आहेत. ही कादंबरी विशेषत: अकेरळी वाचकांना केरळातील सामाजिक इतिहासाच्या एका विशिष्ठ काळाची ओळख करून देण्यास सहायक ठरेल. नंतर वक्कि आणि एली झालेल्या कोच्चुरामन व गोरी नीलीला प्रेमाने ओथंबलेल्या केरळी मजुरांचे प्रतिनिधी म्हणून आपण कुठंही दाखवू (उभं करू) शकतो. वक्कच्चन साहेब आणि कञ्जुशंकरन साहेब हे तर केरळी धनिकांचे आरंभीचे विविध भाव यथायोग्य साकार करतात. मजुरांचा नेता म्हणून वावरण्यासाठी खानदानी घराण्याचा त्याग करणाऱ्या 'कॉम्रेड' नीलकंठनची (त्याच्या 'मौल्यवान मनगटी घड्याळा'चा उल्लेख करण्यास देव विसरलेले नाहीत), आणि केरळवासियांची तर चांगली ओळख आहे.

केशवदेव विरोधाचे (प्रतिवादाचे) नायक आहेत. त्यांच्या आत्मकथेकडे कल असलेल्या व तीन खंडात प्रकाशित झालेल्या कथा-संग्रहाचं नावही 'विरोध (एतिर्प्पु) च आहे. विरोध करणं (प्रतिवाद करणं) हे तर केरळी लोकांच्या सामाजिक जीवनाचं अविभाज्य अंग आहे. आणि वादविवाद करणं केरळवासि-

यांच्या स्वभावातील प्रमुख विशेष आहे. नेहमी वादविवादाचा (चर्चेचा) विषय झालेल्या केशवदेवांनी आपल्या आयुष्यात साहित्यिक या नात्याने मात्र पूर्ण लोकप्रियता मिळवली आहे– ही केशवदेवांसाठी व केरळवासियांसाठीही गौरवाचीच गोष्ट म्हणावी लागेल.

जर वाद-विवाद हा केरळी लोकांचा स्थायीभाव असेल–तर विरोध हे केशवदेवांचं जीवनावश्यक तत्त्व आहे. बहुतेक वेळा केवळ 'विरोधासाठी विरोध–' असंच त्यांचं तत्त्व असतं. परंतु खरं पाहता, विरोधाची ही जाणीवच त्यांच्या कलाकृतींना आदराचं स्थान मिळवून देते. तरूणांनाही लाजवणारी ऊर्जस्वल वृत्ती आणि वीरत्वाचा जोश देवांमध्ये आहे. ते जीवनावर प्रेम करणारे आहेत, जीवनाचे चिरतरूण विद्यार्थी आहेत. जीवनाबद्दल त्यांचा असणारा सळसळता उत्साह व विश्वासच त्यांना भग्न झालेल्या प्रासादांच्या पायावर नवा प्रासाद बांधण्याची आणि स्वतः भग्न केलेल्या प्रासादांचा पुनरुद्धार करण्याची प्रेरणा देतात. त्यांनी नवोदित लेखकांना दिलेला संदेश या ठिकाणी उद्धृत केल्यास अयोग्य ठरणार नाही – "लिहा ! मला सांगायचंय, लिहा, लिहीत रहा ! जर लिहायचं असेल, तर जीवनाचं अध्ययन करायला हवं. म्हणूनच जीवनाचा अभ्यास हा मुख्य आहे."

केशवदेव पूर्णपणे केरळी आहेत. अकेरळी विषयावर त्यांनी काही लिहिलं असेल का नाही, याबद्दल शंकाच आहे. केशवदेवांची 'दर्पण' कादंबरी केरळीजनांच्या स्वभाववैचित्र्याचं उत्तम उदाहरण आहे. मी अभिमानपूर्वक हे पुस्तक सहृदय वाचकांसमोर सादर करीत आहे.

—टी. एन. जयचंद्रन

# [१]

अंतोणीचा बाप कोन्चुरामन होता आणि ताडी काढणारा कोच्चय्याप्पन कोन्चुरामनचा बाप होता.

गोऱ्या 'नीली'चा बाप होता कंटन पुलयन.[1] तो खणण्याच्या कामात वस्ताद होता.

कोच्चय्यप्पन आणि कंटन पुलयन दोघेही वक्कच्चनच्या[2] नारळाच्या बागेत काम करीत होते. दक्षिणेच्या बाजूला कंटन पुलयन आणि उत्तरेला कोच्चय्यप्पन चोवन.[3] असे दोन दिशांना रहात असत. एकाच बागेत राहूनही शिवाशिवीच्या दृष्टीनं दोघंही एकमेकांपासून चांगलेच लांब होते. दोन्ही आवारांमधून वहाणारा एक नालाही होता.

कोन्चुरामन हा कोच्चय्यप्पनचा मोठा मुलगा. त्याला चोवीस पूर्ण झाली होती. जेमतेम तिसरी चौथीपर्यंत त्याचं शिक्षण झालं होतं. त्याचं शरीर चांगलं पोसलेलं होतं— आणि दिसायलाही तो देखणा होता. आपले कुरळे केस नीट बसवून आणि बनियन घालून तो बाहेर जायचा तेव्हा त्याला पहायला गोरी नीली मुद्दाम आपल्या अंगणात उभी रहायची.

कोन्चुरामन कोचीन बंदरावर जहाजांवरून माल उतरणारा एक नावाडी होता. त्यावेळी कोचीन बंदरात जहाजं आतपर्यंत येऊ शकत नसत. माल भरलेली जहाजं दूरवर नांगर टाकून उभी रहात आणि निरनिराळ्या नावांतून जहाजातला माल किनाऱ्यावर उतरला जाई. अशा नावांपैकी एका नावेचा नावाडी होता कोन्चुरामन. माल उतरण्याच्या प्रमाणात मजुरी दिली जाई, त्यामुळं नाववाल्यांना इतरांपेक्षा चांगलं उत्पन्न व्हायचं.

---

१ पुलयन—केरळमधील एक कनिष्ठ जात (हरिजन).

२ एक ज्यूंचे ना.

३ चोवन-एक अवर्ण जातीतलं नाव. यांना ईषवन किंवा तीय्यन असेही म्हणतात. हे पुलयनपेक्षा स्वत:ला उच्च समजतात. या दोघात रोटी बेटी व्यवहार होत नाही.

कोञ्चय्यप्पन आणि कोञ्चुरामन अशा प्रकारे मजुरी करून पैसे मिळवीत असल्यामुळं त्यांचा उदरनिर्वाह मजेत चालला होता. थोडे पैसे शिल्लकही पडत होते. कुणाला चार पैसे उसने पासने लागले तर तो तसेही देत होता. त्यामुळं हळूहळू कोञ्चुरामनची आई पारू हिला शेजारणीपाजारणीत महत्त्वाचं स्थान प्राप्त झालं.

शेतकऱ्यात कंटन पुलयनला फार मागणी होती. तो दोन माणसं खणण्याचं जेवढं काम करतील तेवढं एकटा करीत असे; आणि दीड माणसांइतकी मजुरी कमवीत असे. पण पोट हातावरचं होतं त्यामुळं रोज जे मिळायचं ते खाण्यावारीच खपन जायचं. कंटन पक्का खादाड होता आणि ताडी देखील दाबून प्यायचा. स्वतःच्या पैशानं ताडी घेऊनही भागलं नाही तर ताडीच्या झाडावर चढून चोरून ताडी प्यायलाही तो कमी करायचा नाही.

अषकी[१] ही कंटनची बायको. तिची पहिली मुलगी गेली. दुसऱ्या मुलीचं नाव नीली. ती गोरी गोरी पान होती म्हणून सगळेजण तिला 'गोरी नीली' म्हणायचे. जेव्हा नीली जन्मली तेव्हा काही लोक म्हणाले,'काळ्या कोंबडीनं पांढरं अंडं घातलं !' अर्थात् या उद्गारामागं एक कथा होती.

वक्कच्चन कधी कधी संध्याकाळी आपल्या बागेतून फेरफटका मारायचा. तो गोरापान होता आणि त्यानं भरघोस मिशा आणि कल्ले ठेवले होते. तो धोतर आणि उपरणं अशा पोशाखात जात असला की एखादा राजाच रंगभूमी-वरून चालला आहे असं वाटायचं ! आपल्या जमीन जुमल्यावर लक्ष ठेवणं आणि नोकरवर्गाची विचारपूस करणं हे त्यांच्या फेरफटक्याचे उद्देश असत. आपल्या नोकर माणसांशी तो दयाळू पणानं वागे. त्यातल्या त्यात ज्यांच्या बायका सुंदर आहेत त्यांच्याशी त्याची वागणूक फारच सहानुभूतीची असे. अशा प्रकारच्या सहानुभूतीला सर्वात अधिक पात्र ठरला होता. कंटन पुलयन.

अषकी पुलयीचे[२] डोळे फार सुंदर होते आणि तिचं हसणं मोहक होतं. त्यामुळं वक्कच्चन खूप वेळ तिच्या अंगणात बसून रहायचा. त्याच्यासाठी एक खास कॅनव्हासची खुर्ची तिथं तयार करून ठेवलेली होती. वक्कच्चन आला की अषकी लगेच ती खुर्ची अंगणात आणून ठेवायची. त्याचवेळी कंटन वक्कच्चनसाठी

---

१ अषकी म्हणजे रूपसुंदर स्त्री.

२ पुलयी—पुलयनची बायको.

पान आणायला बाहेर पडायचा ! एक दोन वेळचे पान आणायला वक्कच्चन कंटनला अख्खा रूपाया द्यायचा. कंटन पान आणायला निघाला की वक्कच्चन त्याला ओरडून सांगायचा, 'वाटलं तर तू ताडी पिऊन देखील आलास तरी चालेल !'

वक्कच्चन सांगो अगर न सांगो कंटन ताडी प्यायला जायचाच.

शेजाऱ्यापाजाऱ्यांना हे काय दिसायचं नाही ? पण पाहूनही ते न पाहिल्यासारखं करीत.

वक्कच्चन ज्यावेळी नारळ काढायचा तेव्हा प्रत्येक मजुराला दोन दोन नारळ द्यायचा. पण वक्कच्चन निघून गेल्यावर अषकी दहा पंधरा नारळ घेऊन विकायला जायची !

कधी कधी रात्री कंटनच्या झोपडी सभोवती असलेल्या नारळाच्या झाडांवरून नारळ खाली पडलेले ऐकू यायचे. आसपासचे लोक वक्कच्चनला सांगायला गेले की तो ओरडून म्हणायचा, 'असं आहे काय ? थाबा, मी त्याला चांगला झोडपून काढतो !' पण तरीही कंटनचं नारळ तोडण्याचं काम चालूच रहायचं !

असाच एकदा वक्कच्चनकडची नारळतोड चालू असताना कोच्चय्यप्पनच्या अंगणातल्या नारळाच्या झाडावरचा एक गुच्छच्या गुच्छ नाहीसा झाल्याचं त्याला आढळून आलं–तशी तो एकदम् चिडला आणि त्यानं कोच्चय्यप्पनला शिव्या घातल्या. इतकंच नव्हे तर पोलिसात वर्दी देण्याचीही धमकी दिली, तशी कोच्चय्यप्पननं विचारलं, "मालक, तुम्ही मला का उगीच बोलत आहात ? कंटन पुलयननं नारळ घेतले तर मात्र तुम्ही गप्प बसता, असं का ?"

"तो माझा प्रश्न आहे." वक्कच्चन चिडून उत्तरला, "तू कोण मला विचारणारा ?"

"उगीच पक्षपात करू नका, आपल्या सर्वांच्या वर जो परमेश्वर आहे. तो सगळं पहातोय्"

कोच्चय्यप्पन तरीही नारळ तोडतच राहिला, पुन्हा वक्कच्चननं विचारलं तेव्हा त्यानं परत पूर्वीचंच उत्तर दिलं.

वक्कच्चनच्या जागेत रहाणारी आणखी एक बाई होती. साराम्मा.[1] ती

---

१ सारा वा साराम्मा (सारा+अम्मा). ख्रिश्चन बाईचं नाव.

घरोघरी जाऊन कोंडा गोळा करून विकायची. कोणी तिला चहाडखोर साराम्मा म्हणत तर कोणी 'बडबडी साराम्मा' संबोधत.

साराम्मा वक्कच्चनची पक्षपाती होती. पण तरीही ती वक्कच्चनच्या कृपेस पात्र ठरली नव्हती. त्यामुळं ती नेहमी कोच्चय्यप्पनच्या झोपडीवर यायची आणि पारूशी गप्पा मारता मारता अषकोची निंदा करायची, साराम्माच्या कोंड्याच्या व्यापारासाठी पारूच उधार रक्कम देत असे. त्यामुळं दोघींची मैत्री होती.

पारू म्हणायची—

'सगळ्यांना वाटतं की, वक्कच्चन साहेबाला गरीबांविषयी कळवळा आहे.'

'मग तुला काय वाटतं की, वक्कच्चन साहेबाला गरिबांविषयी प्रेम नाही ?'

'तसं असतं तर त्यांनी आमच्याकडंही पाहिलं असतं.'

'त्यात एक खुबी आहे.'

'काय ?'

'केवळ गरीब असून चालत नाही.'

'मग आणखी काय हवं ?'

'दिसायलाही सुंदर हवं.'

—असं तिनं उत्तर दिल्यावर दोघी खळखळून हसल्या.

अषकीला जेव्हा मुलगी झाली तेव्हा आसपासच्या सगळ्या बायका मुलगी बघायला गेल्या आणि सगळ्याजणी पुटपुटल्या, 'काळ्या कोंबडीनं पांढरं अंडं घातलं.' कोंडा विकण्याऱ्या साराम्मानं पारूला विचारलं—

'ही मुलगी मोठी होईल तेव्हा कशी दिसेल, सांगशील ?'

'नाही बाई, तूच सांग.'

'वक्कच्चनची धाकटी मुलगी पाहयलीस तू ?'

'हो पाहिलीय्,'

'अगदी तिच्यासारखी दिसेल !'

—मग दोघी एकदम खळखळून हसल्या !

  

नीली मोठी झाली. वयात आली. सोळाव्या वर्षात तिनं पाऊल टाकलं. आई-

सारखे सुंदर डोळे आणि मोहक हसणं जणू तिला वंशपरंपरेनं प्राप्त झालं होतं. अषकीच्या सौंदर्यात जो उणेपणा होता तो देखील तिनं भरून काढला होता. लिबासारखी कांती आणि कुरळे केस !

पारू नेहमी आपल्या दक्षिणेच्या बाजूला असलेल्या अंगणात, परसात उभी राहून साराम्माशी गप्पा मारायची. अन् गप्पा मारता मारता बाजूला खूण करायची आणि मग दोघी खूप हसायच्या. कधीकधी आसपासच्या बायकाही तिथं जमायच्या. अषकी हे सगळं पहात असायची. त्या काय बोलतात आणि का हसतात हे तिला माहीत होतं. पण पाहूनही न पाहिल्यासारखं ती करायची. नीलीला तर ती तिकडे फिरकूही द्यायची नाही.

कोच्चय्यप्पन आणि कंटन एकमेकांशी बोलतही नसत. रत्स्यात कुठं आमोरा-समोरी झाली तर खाली मान घालून निघून जात.

एक दिवस कोच्चुरामन त्यांच्या परसात उभा होता. तेवढयात पारू आली आणि तिनं त्याला विचारलं, "पोरा, तू नेहमी इथं उभा राहून तिकडं काय पहात असतोस ?"

कंटनच्या अंगणात नारळाच्या झाडाखाली उभ्या असलेल्या नीलीनं पारूला पाहिलं आणि ती आपल्या झोपडीत शिरली.

कोच्चुरामननं आईला विचारलं,

"तिकडं पाहिलं तर काय होतं ?"

"मग इकडं का नाही तू पहात ?"

"तुला झालंय् तरी काय ?" तिचं उत्तर ऐकून कोच्चुरामननं प्रश्न केला, "वेडबिड तर लागलं नाही ना ?"

"वेड तुला लागलंय् !" ती उत्तरली !

एवढं झालं तरी कोच्चुरामन आपल्या परसातून नीलीच्या अंगणाकडं पहायचा आणि नीली त्याच्याकडं. दोघं टक लावून एकमेकांकडे पहायचे आणि हसायचे. पारूने कोच्चय्यप्पनला त्याच्या मुलाच्या या 'कर्तृत्वाची' जाणीव करून दिली. तेव्हा कोच्चय्यप्पन म्हणाला,

"माझा मुलगा कुठंही पाहील. तुला काय करायचंय ?"

"अशा पाहण्यानं एखादी आफत येईल !"

"त्याला मी काय करणार ? का मुलाला सांगू की बाबारे तिकडं पाहू नकोस ?"

"तसं नाही. माझ्या सांगण्याचा हेतू एवढाच आहे." पारू सांगू लागली, "की तू आता सून आपली पाहिजेस."

"पण मी म्हणतो, हे त्यानं मला सांगायला हवं की नको ?"

—कोच्चुरामनचं वागणं बरोबर नाही हे कोच्चयय्प्पनला समजत का नव्हतं ? पण काय करणार ?

कधी कधी पारू परसात जाऊन आकाशाकडं पहात म्हणायची, 'मुलगी अगदी आईच्या वळणावर गेलीय् !' अन् मग कितीतरी वेळ ती काहीबाही बडबडत रहायची !

पहिल्या पहिल्यांदा अषकीनं हे सगळं ऐकून न ऐकल्यासारखं केलं—पण जेव्हा हे सगळं तिला सहन होईना तेव्हा तीदेखील शिव्या द्यायला लागली. ती म्हणायची—

'माझी मुलगी माझ्या घरात असते. तुम्ही तुमचा मुलगा ताब्यात नीट ठेवा नाहीतर माझ्या कोयतीशी गाठ आहे !'

—कोच्चुरामन आणि नीली यांचं प्रेमप्रकरण चालूच राहिलं. आणि पारू नि अषकी यांची शिवीगाळही थांबली नाही.

अर्थात् कंटन आणि कोच्चयय्प्पन यांना हे सगळं माहीत असूनही ते एकमेकांना त्याबद्दल एका शब्दानंही बोलले नव्हते. पण आता मात्र कंटनला धडा शिकवायचा कोच्चयय्प्पननं पुरता निश्चय केला.

त्या रात्री कंटन ताडीच्या झाडावर चढून ताडी पिण्यात गर्क होता. ज्या झाडांवर कोच्चुरामनचा हक्क होता त्या झाडावर चढूनही तो कधी कधी चोरून ताडी पीत असे. एक दिवस तो असाच झाडावर चढला असताना कोच्चयय्प्पननं मुद्दाम झाडावर ठेवलेली वाकस त्याच्या पायात घुसली. मग कंटन कसा तरी कडमडत रक्तबंबाळ पायानं झाडावरून खाली उतरला—

—तशी लपून बसलेला कोच्चयय्प्पन पुढं आला आणि त्यानं कंटनला विचारलं,—

"काय दोस्त, ताडी गोड होती ना ?"

"तुझं हे वागणं बरोबर नाही."

मग कंटन जवळ जवळ महिनाभर आजारी होता. त्यावेळी पारू आणि साराम्मा सगळ्यांना सांगत फिरत होत्या की, 'कंटनच्या आजारपणाचा सगळा खर्च वक्कच्चन साहेबच करतोय !'

अंगणात उभ्या असलेल्या नीलीकडं पाहून कोच्चुरामनचं हसणं तरीही चालूच होतं.

नीलीच्या झोपडीतून नेहमी भांडणं ऐकू येत. कधी कधी कंटन ओरडून म्हणायचा, 'मी या पोरीचा जीव घेईन—तिला कापून टाकीन !'

कंटनकडे चात्तन नावाचा तरुण नेहमी यायचा. त्यानं नीलीशी लग्न करायचा मनसुबा रचला होता. नीलीच्या आईबापांनाही तो पसंत होता. जेव्हा जेव्हा तो यायचा तेव्हा मिठाई घेऊन यायचा. पण त्यानं आणलेली मिठाई नीली कधी खायची नाही. तिला कुणी ती मिठाई दिली तर ती घ्यायची पण मग हळूच सर्वांच्या नकळत घरामागच्या नाल्यात मिठाई फेकून द्यायची !

एक दिवस अषकीनं तिला पाहिलं तशी तिनं तिला विचारलं, "अगं, तू मिठाई अशी नाल्यात का फेकून दिलीस ?"

"मला ती नकोय्."

"का ?"

"त्यानं दिलेलं काहीही मी घेणार नाही !"

"मग तुला पुन्हा कोण देईल !"

"मला कुणाकडूनच काही नकोय् !"

—बाब गंभीर होत चालली. एक दिवस कंटनच्या झोपडीतून खूप आरडा-ओरडा ऐकू आला आणि त्या पाठोपाठ नीलीची करूण किंकाळी !

दुसऱ्या दिवशी त्यांच्या अंगणात उभा राहून चात्तन ओरडला, "मी त्या बदमाषाचं मस्तक उडवीन !"

त्या दिवशी आणि रात्री कोच्चय्यप्पन सारख्या धमक्या आणि शिव्या देत होता.

त्यानंतर कोच्चुरामन कधी त्यांच्या परसात दिसला नाही आणि नीली पण अंगणात उभी असलेली कुणी पाहिली नाही !

## [२]

कोंडा विकणाऱ्या साराम्मानं पारूला एक दिवस बातमी दिली की, 'पश्चिमेकडच्या शेतावर जो बांध आहे, त्या बांधावरच्या छोट्या नारळीच्या झाडाखाली कोच्चुरामन आणि नीली या दोघांना मी पाहिलं !' साराम्मा पुष्कळदा खोट्यानाट्या गोष्टी सांगायची. त्यामुळं पारू तिच्या या बोलण्यावर विश्वास ठेवायला फारशी तयार नव्हती ! तरीदेखील तिनं कोच्चुरामनला एकट्याला गाठून त्याबद्दल विचारलं, तशी त्यानं ती बातमी साफ खोटी असल्याचं निक्षून सांगितलं.

काही दिवसांनंतर साराम्मानं आणखी एक बातमी पारूला सांगितली की, कोच्चुरामननं नीलीला एक ब्लाऊज दिला आहे ! ते ऐकल्यावर पारू चिडली आणि साराम्माला म्हणाली, "तू असं खोटंनाटं सांगत जाऊ नकोस !"

तिच्या या बोलण्यानं साराम्मा संतापली आणि पारूला म्हणाली, "तुला हे खोटं वाटतंय ना, मग ऐक. नीली आता मासे आणायला जाईल तेव्हा तू तिला जरा पहा– तिच्या अंगावर तोच झंपर आहे ते !"

पारू आणि साराम्मा त्या गल्लीत शिरल्या तेव्हा माशांची टोपली घेऊन येणारी नीली त्या दोघींना दिसली. नीलीनं नवा झंपर घातलेला पाहताक्षणी पारूच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. आणि तिला उद्देशून ती रागाच्या भरात तिला शिव्या देत म्हणाली, "पोरांकडं तिरप्या नजरेनं पाहून आणि हावभाव करून त्यांच्याकडून कापड मिळवतेस काय ? रांड कुठली !" यानंतर ती खूप बोलली. माणसं जमा झाली अन् नीली रडत रडत आपल्या झोपडीत शिरली.

मग थोडा वेळ गेला आणि हातात कोयती घेऊन अषकी एखाद्या वादळासारखी तिथं येऊन पोहोचली. पारूनंही एक मोठा चाकू आणला. मग काय विचारता ! दोघींनी एकमेकींवर अपशब्दांचा वर्षाव केला. त्यांच्या बोलण्यातून जमलेल्यांना काहीबाही कळलंच. कोच्चुरामननं शिवलेला झंपर नीलीनं घातल्याचं आपण पाहिलं असल्याचं पारू सांगत होती – तर अषकीचं म्हणणं असं होतं की, नीलीनं पैसा पैसा जमवून स्वत: झंपर घेतला होता – शेवटी साराम्मानं आपल्याला हे सांगितल्याचं पारूला कबूल करावं लागलं !

तशी अषकी हातात कोयती तशीच घेऊन साराम्माच्या अंगावर धावून गेली.

साराम्मा चटकन् मागच्या मागं पळून गेली. सर्वांना वाटलं साराम्मा घाबरून पळून गेली. पण थोड्याच वेळानं ती शंकरन् शिप्याला घेऊन तिथं हजर झाली आणि तिथं जमलेल्यांना म्हणाली, "हा शंकरन् शिंपी आहे ना, त्यानंच मला सांगितलं. आता खरं की खोटं हे यालाच विचारा !"

शंकरननं मग सगळं सांगून टाकलं. तो म्हणाला, "पिवळ्या रंगावर काळे ठिपके असलेलं झंपरचं कापड कोच्चुरामननंच मला आणून दिलं. मीच ते झंपर शिवलं !"

आता मात्र साराम्माचं बोलणं सगळ्यांना पटलं—सर्वांनी मग नीलीकडं पाहिलं. तिच्या अंगातला झंपर तसाच होता – पिवळ्या रंगावर काळे ठिपके. साराम्मानं अखेर जिंकली. मग तिनं अषकीला खवचटपणानं विचारलं, "काय ग अषकी, आता तुझी कोयती कुठाय ?"

मुलगी आईच्याच वळणावर चालल्याची मग कुजबूज झाली.

अषकी खाली मान घालून आपल्या झोपडीत शिरली. त्या रात्री देखील कंटनच्या झोपडीतून खूप आरडा ओरडा आणि किंकाळ्या ऐकू आल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळी कंटननं फावडं उंच करून घोषणा केली की, 'पुढं कधी माझी मुलगी त्या पोरट्याशी बोलली किंवा तिनं त्याच्याकडं पाहीलं तर मी तिचं मुंडकं असं गाडून टाकीन !' त्यानं लगेच अंगण खोदून दाखविलं !

संध्याकाळी चात्तन आला. त्यानं अंगणाच्या कडेला चाकूची मूठ उघडीत प्रतिज्ञा केली, 'जर त्या सैतानानं या मुलीशी गोष्टी केल्या तर त्याचं डोकं असं तुटून खाली पडेल !'

त्यानं चाकूनं फुलझाडाच्या फांदीवर वार केला–फांदी तुटून खाली पडली.

कोच्चय्यप्पन आपल्या परसात उभा राहून चाकूला धार लावीत म्हणाला, 'आता यापुढं मी असलं जर काही ऐकलं तर तो पोरटा आणि ती पोरटी दोघांचीही शिरं अशी धडावेगळी करीन !' असं म्हणून त्यानं एक शहाळं कापलं !

एवढं घडल्यावर नीली आणि कोच्चुरामन यांनी एकमेकांकडं पाहिलं नाही की दोघं हसले नाहीत ! मग कुणी कुणावर कसला आळही घेतला नाही !

नीली आणि चात्तन यांच्या लग्नाची तीथ निश्चित झाली. झोपडीच्या अंगणात मांडव घातला गेला. इकडे कोच्चय्यप्पननंदेखील कोच्चुरामनच्या लग्ना-

बद्दल चारचाघांशी सल्ला मसलत केली. एक मुलगीदेखील तो पाहून आला.

हे सगळं चाललं होतं आणि एक दिवस कोच्चयप्पनच्या परसात एकदम आरडाओरडा ऐकू आला. शेजारी पाजारी उठून पहातात तो काय, अषकी आणि कंटन कोयती आणि चाकू घेऊन धमकावीत होते, "आमच्या मुलीला बाहेर काढ, नाहीतर आत घुसावं लागेल, याद राख."

पारू धावत आत आली. कोच्चुरामन रात्री जिथं झोपला होता तिथं तो नव्हता. मग ती किंचाळतच बाहेर आली, "माझ्या पोराला तुझ्या पोरीनं पळवून नेलं काय? मी तुमचे आणि त्यांचे तुकडे तुकडे करून टाकीन!" तिच्या पण हातात आता एक कोयती होती!

कोच्चयप्पननं एक मुसळ आणलं नि ते उंच करून त्यानं गर्जना केली, 'माझा मुलगा परत द्या, नाहीतर मी एकेकाची डोकी फोडून टाकीन!"

कंटननं चाकू चालवण्या आधीच कोच्चयप्पननं त्याच्या डोक्यावर मुसळ मारलं. तशी तो बेहोष होऊन खाली पडला.

अषकी आणि पारू दोघींनी एकमेकींवर कोयतीनं वार केले. अषकीच्या कोयतीचं टोक पारूच्या पोटात घुसलं तर पारूनं अषकीच्या छातीवर वार केला—दोघीही जमीनीवर पडल्या. लोकांची गर्दी जमली——तोवर सकाळ झाली.

'मारून टाकतो सगळ्यांना–' असं ओरडत चात्तन आला. त्यानं कोच्चयप्पनच्या झोपडीचे तट्टे काढून टाकले. तो खरं म्हणजे झोपडीला आगच लावणार होता. पण लोकांनी त्याला नारळीच्या झाडाला बांधून टाकलं!

मग पोलीस आले. कंटन, अषकी आणि पारू तिघांना इस्पितळात नेण्यात आलं कोच्चयप्पन आणि चात्तनला पोलिस कस्टडीत बंद केलं गेलं.

  

रोजच्याप्रमाणं नीली जेवण झाल्यावर अषकी शेजारी चटईवर झोपली होती आणि रोजच्या प्रमाणचं कोच्चुरामनही एक विडी ओढून ओसरीवर पडला होता. याबद्दल कोणाच्याही मनात शंका नव्हती!

मध्येच एकदम अषकी ताडकन् उठली आणि तिनं नीलीला हाक मारली. तिची ओ आली नाही. तेव्हा तिनं चटईवर चाचपून पाहिलं; चटईवरही ती नाही

हे पाहिल्यावर अषकी बाहेर आली. बाहेरही नीली दिसली नाही तेव्हा तिनं कंटनला उठवलं. मग दोघंही नवराबायको भोवताली ती कुठं दिसते का हे पहायला गेले. तेवढ्यात तिला, नीलीला कोच्चुरामननं बोलावून नेलं असेल अशी शंका आली आणि मग पुढचा सगळा गोंधळ झाला.

कोच्चुरामन आणि नीली कुठं गेले हे कुणालाच कळलं नाही. ज्यांनी त्यांना शोधायचं ती माणसं एक इस्पितळात तरी होती किंवा पोलिस कस्टडीत तरी.

नीली आणि कोच्चुरामन दोघांनीही आधीच गाव सोडून जायचं ठरलेलं होतं. तशी त्यांनी तयारीही केली होती. कुठं जायचं, कसं जायचं हे कोच्चुरामननं पक्कं केलं होतं.

आलप्पुषाला (आलप्पी) कोच्चुरामनचा एक लहानपणचा मित्र रहात होता. त्याचं नाव होतं वासु. आलप्पुषाच्या नारळाच्या शेंड्यांच्या कॉयरच्या कारखान्यात तो कामगार होता.

वासु एकदोनदा कोच्चीला गेला होता. तिथं गेला की तो कोच्चरामनला भेटायचाच. तो कोच्चुरामनला नेहमी म्हणायचा की, 'तू जर होडीचं काम सोडलंस तर तुला आलप्पुषाला कॉयरच्या कारखान्यात काम मिळवून देईन!' म्हणून यावेळी कोच्चुरामननं निश्चय केला की आता आलप्पुषाला जायचं आणि तिथंच स्थायिक व्हायचं.

रात्री जेव्हा निजानीज झाली आणि गल्लीतून येणारे जाणारेही थांबले तेव्हा गाठोडं घेऊन कोच्चुरामन निघाला व नीलीची वाट पाहू लागला. आधी ठरल्याप्रमाणं नीलीपण थोड्याच वेळात आली. मग दोघंही बंदरावर गेले. तिथून प्रवास करणारे प्रवासी फारच थोडे असत. आलप्पुषाला जाणारी बोट आली तेव्हा कोच्चुरामननं जोरानं ओरडून आणि काड्यापेटीचा उजेड दाखवून बोटवाल्यांना खूण केली. बोट किनाऱ्याशी आली तशी ती दोघं बोटीवर चढली.

ती दोघं आलप्पुषा बंदरावर पोहोचली तेव्हा सूर्योदय झाला होता. वासूने आपल्या घराची वाट कोच्चुरामनला आधीच सांगितलेली होती. ती आठवत आठवत दोघे चालले होते. शेवटी कुणाला तरी विचारून त्यांनी वासूचं घर शोधून काढलं.

तट्ट्याच्या एका छोटया झोपडीत वासूचं कुटुंब रहात होतं. कुटुंब म्हणजे काय, बायको आणि मलगा. पण त्याच्या बायकोची माहेरची माणसं पुष्कळ होती. म्हणून

वासु आपल्या बायकोसह वेगळ्या झोपडीत रहात होता.

कोच्चुरामन एका बाईला घेऊन आपल्या घरी आलेला पाहिल्यावर वासु घाबरला. कोच्चुरामनला त्याची थोडी कल्पना होतीच म्हणून त्याला तितकेसे आश्चर्य वाटले नाही. त्याने वासूला थोडक्यात सगळी हकिगत सांगितली. त्याच-बरोबर हेही सांगितलं की, 'तो वासूकडे काही दिवस राहून नोकरी शोधेल आणि नोकरी मिळाल्यावर तो रहायला जागा पाहील.'

वासूनं त्यावर काही आक्षेप घेतला नाही. कोच्चुरामनची बायको कुठल्याही जातीची असली तरी ती जर त्याला स्वतःला पसंत असेल तर वासूचं काहीही म्हणणं नव्हतं. आपल्या लहानपणच्या मित्राला आपल्या शक्तीनुसार मदत करण्याची वासूची फार इच्छा होती.

पण त्याच्या सासुरवाडीची माणसं कट्टर सनातनी होती. ईषव जातीच्या एका तरूणानं पुलय जातीच्या मुलीशी लग्न केलं आहे हे त्यांना कधीच आवडलं नसतं. आणि असा हा तरुण वासूचा मित्र आहे हे ऐकलं तर आणखीनच नाराज होतील. पुलयी स्त्री वासूच्या घरात रहायला आली आहे असं जेव्हा ते ऐकतील तेव्हा तिला घरातून हाकलून द्यायला ती धावत येतील. याशिवाय आणखी एक भानगड होती. वासूचा एक मेहुणा पक्का मवाली होता, गुंड होता !

अशावेळी काय करायचं ? का कोच्चुरामनला आपल्या सुंदर बायकोसह आलप्पुषा शहरात असहाय होऊन भटकू द्यायचं ? वासूच्या तर भरवशावर ती दोघं आलप्पुषाला आली होती.

सगळा विचार करून वासूनं त्या दोघांना काही दिवस आपल्या घरी राहू द्यायचं ठरवलं. नीलीची जात कोणती हे त्यानं आपल्या बायकोला देखील सांगितलं नाही. कोच्चुरामनचा आपल्या रीतीरिवाजानुसारच विवाह झाला आहे आणि त्याच्या बायकोचे नाव भार्गवी आहे असं त्यानं तिला सांगितलं. अर्थात् आपण आपल्या बायकोला काय काय सांगितलं आहे हे कोच्चुरामन आणि नीली यांना सांगायला तो विसरला नाही. कोच्चुरामनजवळ थोडेसे पैसे होते त्यामुळं पैशाचा प्रश्न नव्हता.

त्याच दिवशी वासु कोच्चुरामनला आपल्या कॉयरच्या कारखान्यात घेऊन गेला. तिथल्या मिस्त्रीशी आणि मॅनेजरशी त्याने त्याची गाठ घालून दिली. आणि तो काम शिकायलास जाऊ लागला. अशा तऱ्हेनं तीन-चार दिवस गेले.

वासूकडं त्याचा एक मित्र आपल्या बायकोला घेऊन उतरला आहे ही बातमी वासूच्या सासुरवाडीला पोहोचलीच. लगेच सासुरवाडीची माणसं पाहुण्यांना पहायला आली. मुलीला पाहून सगळेजण खुष झाले. देखणी, नम्र आणि भोळी अशी ती त्यांना वाटली. पण एका गोष्टीचं मात्र त्यांना आश्चर्य वाटलं. की पुलय लोकात जे शब्द वापरतात आणि ईषव जातीत वापरत नाहीत ते तिच्या बोल-ण्यात कसे येतात ? या प्रश्नाचं वासूने उत्तर दिलं की, कोच्चिमध्ये पुलय जातीचे लोक जास्त आहेत आणि त्यांच्यात राहून ही मुलगी देखील तसंच बोलायला शिकली आहे. पण कुणाला ते पटलेलं दिसलं नाही. मनात किंतु ठेवूनच सर्वजण घरी परतले.

तशातच कारखान्यातला एक मिस्त्री कामानिमित्ताने कोच्चिला जाऊन आला होता. परत आल्यानंतर बोलता बोलता तो म्हणाला की, एका ईषव मुलानं पुलय मुलगी पळवून नेली आहे. ती दोघं पळून गेल्यावर त्या दोघांच्या घरातल्या माणसांची बरीच मारामारी झाली आणि दोघं-तिघं इस्पितळात टाकली आहेत हे त्यानं सांगितलं. हे ऐकल्यावर वासु व कोच्चुरामन दोघंही घाबरले. तिथं रक्त-पात झाल्याची बातमी ऐकून कोच्चुरामन घाबरला. तर आपल्या शेजारी पाजारी, सासुरवाडीला ही बातमी कळली तर काय होईल या कल्पनेनं वासु घाबरला.

एक दिवस वासूच्या त्या मवाली मेहुण्यानं वासूला बोलावून सांगितलं, "तुम्ही, तुमचा तो मित्र आणि त्याची ती पुलय बायको यांना जर वेळीच घरा-बाहेर हाकलून दिलं नाही तर मलाच त्यांच्याकडे बघावं लागेल."

मामला बिघडत चालला आहे हे कोच्चुरामनच्या लक्षात आलं आणि वासूला संकटात न टाकता, आपणच तिथून बाहेर पडायचा त्यानं निश्चय केला. पण जाणार कुठे ? आपल्या ओळखीच्या लोकांना त्यानं जागेविषयी विचारण्यास सुरूवात केली.

पत्रोस नावाचा एक रिक्षावाला कोच्चुरामनची सोय करावयास तयार झाला. पण वासूनं त्याला जाऊ दिलं नाही. पत्रोसचं घर वासूच्या घराजवळच होतं. पत्रोसला न ओळखणारं आलप्पुषा शहरात कोणीच नव्हतं. लहान, मोठे, राव आणि रंक सगळेच त्याला ओळखत होते. सगळ्यांना त्याचा तिरस्कार वाटायचा आणि भीती वाटायची.

रिक्षाच्या दांडीवर पाय ठेवून विडी ओढत तो चौकात बसला असायचा.

कधीतरी रिकामी रिक्षा ओढत काहीतरी गणगुणत जायचा. नेहमी त्याच्याबरोबर रिक्षा असायचीच. पण रिक्षा ओढण्याचं काम पत्रोस करीत नाही हे सर्वांना माहीत होतं. चुकून कधी कुणी त्याला बोलावलं तर तो म्हणायचा, "साहेब, आत्ता मी पॅसेंजर घेणार नाही. मी दुसरीकडे चाललोय. एका सद्‌गृहस्थांना घेऊन जायचंय !"

ज्या गल्लीबोळातून फारशी रहदारी नाही. तिथून संध्याकाळची वेळ झाली की, पत्रोसची रिक्षा धावू लागायची. त्याच्या रिक्षेला मग तेव्हा पडदा लावलेला असायचा. त्याची पडदानशीन रिक्षा कुठे कुठे आणि का जाते हे सर्वांना माहीत होतं. पाहूनही लोक न पाहिल्यासारखं करीत. तो पैसेवाले आणि सत्ताधारी लोकांच्या अतृप्त इच्छा पूर्ण करायचा. त्यामुळं लोक त्याचा तिरस्कारही करायचे आणि भ्यायचेही.

पण कोच्चुरामनला हे काहीच माहीत नव्हतं म्हणून पत्रोसकडं जाऊ नको असं वासूनं जेव्हा त्याला सांगितलं तेव्हा त्यानं त्याला विचारलं—

"मला का जाऊ देत नाहीस ? नाहीतरी तो हिंदू नाहीच आहे ईसाईच आहे. तिथं मला जात विचारायला कोण येणार आहे ?"

"हे सर्व ठीक आहे. पण तरीही एक सांगतो ——"

"काय ?"

"तिथं गेल्यावर तुला दुसरी बायको शोधावी लागेल."

"काय कारण ?"

"काय कारण म्हणजे ? तसाच आहे तो—"

"असं काय ? सांग ना वासु !"

"रात्र झाली की तो तुझ्या बायकोला म्हणेल चल रिक्षात बैस."

"कशासाठी ?"

"कशासाठी म्हणजे ? . . . . ज्याला ती हवी असेल त्याला ती द्यायला !"

कोच्चुरामननं मग मात्र काही विचारलं नाही. पत्रोसशी बोलणं देखील त्यानं सोडून दिलं.

पण आता काय करायचं ? कुठं रहायचं ?

# [३]

वरीदु साहेब मोठे जमीनदार होते. आलप्पुषा शहराच्या आसपास त्यांच्या मोठ्या नारळाच्या बागा होत्या. शहराच्या मध्यभागी त्यांचा एक मोठा बंगला होता. तो बंगला त्यांच्या संपत्तीचा सगळा दिमाख दाखवीत असे.

पहिल्यांदा इंग्रजांनी आलप्पुषा शहरात कॉयरचे कारखाने उभे केले. मग तिथल्या लोकांनी छोटे छोटे कारखाने काढले. पण इंग्रजांच्या कारखान्यांशी देशी कारखाने मुकाबला करू शकत नसत. म्हणून इंग्रजांच्या कारखान्याशी स्पर्धा करू शकेल असा मोठा कारखाना वरीदु साहेबांनी काढला.

पण वरीदु साहेब लोकांना मात्र असं सांगायचे की, आपल्या माणसांना कामं मिळावीत, पैसे मिळावेत म्हणून मी कारखाना काढला. ज्यांना खरी गोष्ट माहीत होती ते त्याच्या ह्या बोलण्यावर विश्वास ठेवीत नसत. पण त्याच्यावर विश्वास ठेवणारेही पुष्कळ लोक होते.

खरं म्हणजे हे एक असं तंत्र होतं की, ज्यामुळे जमीनदाराला भांडवलदार होता येईल आणि तिथल्या माणसांना मजूर बनवता येईल. हे एक असं तंत्र होतं की, ज्यामुळे मजुरांना बांधणाऱ्या साखळदंडाचे एक टोक त्यांच्या घराशी आणि दुसरं कारखान्यांशी भिडलेलं असे. वरीदु साहेबानं हे तंत्र आत्मसात केलेलं होतं. त्यानं केवळ धष्टपुष्ट माणसांनाच आपल्या कारखान्यात काम दिलं होतं. लोकांच्या दृष्टीनं तो एक दयाळू श्रीमंत झाला होता.

कोच्चुरामननं वरीदु साहेबाला आपली अडचण सांगायचं ठरविलं. तो साहेबाच्या घरी गेला आणि त्यानं आपली परिस्थिती त्याला सांगितली. आपला आंतरजातीय विवाह आहे, आपण ईषव असून आपली बायको पुलय आहे त्यामुळे आपल्याला जागा मिळत नाही हेही सांगितलं.

"मग तू ईषव आणि तुझी बायको पुलयी असे का तुम्ही रहाता ?" त्याचे सगळे ऐकून वरीदु साहेबानं विचारलं.

"मग काय करणार साहेब ?" कोच्चुरामननं विचारलं.

"काय करायचं ते मी नंतर सांगीन." वरीदु साहेब उत्तरला, "आता तुम्ही

असं करा. तुम्ही माझ्या जमिनीवर एक झोपडी बांधून रहा. आणि माझ्या कारखान्यात मी तुम्हाला कामही देईन."

कोच्चुरामनला हर्षवायू होण्याची वेळ आली. झोपडीची जागा वगैरे सांगून साहेब म्हणाला, "हे बघ ! झोपडीसाठी लागणारे बांबू, झावळ्या, नारळाच्या तट्ट्या सगळं माझ्या बंगल्यावरूनच घेऊन जा."

कोच्चुरामनच्या डोळ्यात आनंदाश्रू उभे राहिले.

साहेबाची जमीन कारखान्यापासून फारशी दूर नव्हती. तिथून कारखान्याच्या ऑफीसची भिंत दिसायची.

चारी बाजूंनी कांटेरी झाडांचं कुंपण असलेली ती नारळाची मोठी बाग होती. बागेच्या पूवला, दक्षिणेला आणि उत्तरेला लहान लहान रस्ते होते. बागेच्या परिसरात छोटे छोटे झरे होते. तिथं कोच्चुरानमच्या झोपडीशिवाय आणखी पाच सहा झोपड्या होत्या. त्या झोपड्यातून रहाणारी सगळी माणसं वरीदुसाहेबाच्या कॉयरच्या कारखान्यात मजुरी करीत.

कोच्चरामननं नारळाचे झाप आणि तट्टे घेऊन गोठ्यासारखी झोपडी तयार केली. त्याची झोपडी तशी रस्त्यावरच होती. त्या झोपडीत दोनच भाग होते— एक स्वयंपाकघर आणि दुसरी झोपायची खोली. झोपडीचं छप्पर इतकं खाली होतं की कोच्चुरामनला आत जायचं म्हणजे वाकूनच जावं लागे.

तिथं रहायला गेले त्याच दिवशी नीली आणि कोच्चुरामन दोघंही वरीदु साहेबाच्या बंगल्यावर गेले. साहेबाच्या बायकोनं आणि मुलींनी नीलीला आत बोलावून घेतलं. तिची चौकशी केली. नीली सर्वांनाच आवडली. त्यांनी तिला शेरभर तांदूळ, नारळ तिखटमीट आणि एक जुनी साडी दिली.

अशा तऱ्हेनं त्या दोघांनी त्या झोपडीत आपला संसार सुरू केला. दुसऱ्याच दिवशी कोच्चुरामन वरीदु साहेबाच्या कारखान्यात कामगार म्हणून भरती झाला.

कधी कधी नीली साहेबाच्या बंगल्यावर जायची. तिथं तिला काहीना काही तरी काम मिळायचं. तिला कुणी काम करायला सांगितलं नाही तरी ती दिसेल ते काम करायची. मग तिला काहीतरी खायला तरी मिळायचं. किंवा तांदूळ तरी खाणं किंवा तांदूळ काही दिलं तरी नीली आपल्या झोपडीत घेऊन जायची.

बागेत सहा कुटुंब रहात होती. पण कोच्चुरामनच्या कुटुंबाचा कुणाशीही संबंध आला नव्हता. शेजारी पाजारी त्याच्या झोपडीकडं अशा तऱ्हेनं पहात

की, जणू एखादी अजब चीजच पहाताहेत ! ईषव पुरूषानं पळवून आणलेल्या पुलयी स्त्रीकडं ते कुतुहलानं पहात. काहींना तिचा तिरस्कार वाटायचा तर काहींना राग यायचा.

नीलीच्या झोपडीच्या मागं एक ईषव परिवार होता. तिथं नाणी रहायची. नाणी म्हणजे नारायणी. तिचा नीलीवर फार राग होता. राग केवळ जातीवरून नव्हता. नीलीच्या बरोबरीचीच नाणीला एक मुलगी होती. ती कुरूप होती. ती चकणी होती आणि तिचे ओठ लोंबरे होते. त्या काळयाकुट्ट मुलीला पाहिल्यावर नीलीकडं पाहिलं की नाणीला क्रोध आवरत नसे. मग ती दात विचकत म्हणायची, "त्या पोराला काही आपल्या जातीची बायको मिळाली नसती का ? पुलयी मुलगी चोरून आणण्याचं काही नडलं होतं का ?"

नाणीच्या घराला चिकटूनच कुंचूचं घर होतं. सकाळी कुंचु कामावर गेला की, त्याच्या घरात आरडा ओरडा आणि भांडणं सुरू व्हायची. त्याची दोन खोडकर मुलं आणि कोणत्या ना कोणत्या कारणावरून ओरडत रहाणारी मुलगी. आपल्या मुलांच्या आरडया ओरडयानं चिडून त्याची बायको सर्वांना शिव्या द्यायची. मग तिच्या त्या शिवीगाळीतून तिचा नवरा, शेजारीपाजारी आणि खुद्द परमेश्वरदेखील सुटू शकत नसे. कधीकधी नाणी गौरीकडं यायची आणि दोघी मिळून नीलीला नांव ठेवायच्या खरं. त्या कुजबुजायच्या पण त्यांचा आवाज आजूबाजूला ऐकू जायचा. गौरी म्हणायची, "कोच्चुरामन, ईषव आहे असं मला नाही वाटत. तो आहे पुलयन किंवा परयन.[1]"

कुंचूच्या घरापलीकडं दोन ख्रिश्चन कुटुंबं रहात होती. एक औसेपचं आणि दुसरं स्करियाचं. औसेप आणि त्याचे दोन्ही मुलगे कारखान्यात कामाला होते. त्यामुळे त्यांचं नीट भागत होतं. त्यांच्या घरातून कधी भांडणं ऐकू यायची नाहीत. औसेपची बायको मरियाम्मा कधी कधी नीलीच्या झोपडीत डोकवायची. पण नीलीनं कधी तिला पाहिलं तर लगेच निघून जायची.

स्करियाचं घर म्हणजे नुसता नरक होता. त्याची बायको सदा आजारी असायची. धड तिला हिंडताफिरता देखील यायचं नाही. त्याला दोन मुलगे होते पण त्यांची शरीरं नेहमी कुठल्यातरी घाणेरडया फोडांनी लडबडलेली असायची

१ परयन—पुलयनपेक्षा नीच जाति.

स्करिया जेव्हा कामावरून यायचा तेव्हा या नरकात रूतायचा.

त्या मोठ्या घराच्या वायव्येला दोन घरं होती. एक कुंअिप्पेणुचं आणि दुसरं वेलायुधनचं.

कुंअिप्पेणु आपल्या मुलासह रहात होती. मुलाचं नाव होतं भास्करन. तो चांगलाच मोठा होता. कुंअिप्पेणूचा एक प्रियकर होता. तो भास्करनपेक्षा फारसा मोठा नव्हता. त्याचं नाव होतं रामन. खरं म्हणजे रामन. शिंपी होता. पण कुंअिप्पेणूचा प्रियकर होऊन रहाणं हाच त्याचा मुख्य उद्योग होता. आईप्रमाणे भास्करन मुद्धा एक प्रणयविकारी होता.

भास्करन कधी कधी नीलीच्या झोपडीकडे पहायचा आणि शीळ घालायचा. कधीकधी तो तिच्या घरात डोकावायचा आणि विचारायचा. "काय, कोन्चुरामन शेठ आहेत का ?"

"नाहीत." नीली गंभीरपणे उत्तर द्यायची.

"केव्हा येतील ?"

"संध्याकाळी."

"ते आल्यावर मी आलो होतो म्हणून सांगा."

"हो सांगेन."

"काय सांगशील—कोण आलं होतं म्हणून सांगशील ?"

"कुंअिप्पेणुचा मुलगा भास्करन."

"बरं."

त्याच्या सर्व प्रश्नांची उत्तरं मिळायची. पण त्या उत्तरातून आशा निर्माण व्हायची नाही. पण भास्कर निराश व्हायचा नाही. सारखं सारखं मागितलं म्हणजे न देणाराही प्रसन्न होतो असा त्याचा सिद्धांत होता. म्हणून तो सारखा सारखा यायचा आणि नीलीशी असाच बोलायचा.

वेलायुधनला आपल्या तीन लहान बहिणी आणि विधवा आई यांना सांभाळावं लागायचं. तो कारखान्यात काम करायचा आणि त्या चौघी दोऱ्या वळायच्या. त्यामुळं इतरांना नावं ठेवायला त्यांना वेळच नसायचा. तरीदेखील दोऱ्या वळता वळता त्या नीलीच्या झोपडीकडे पाहून काहीतरी बडबडायच्याच.

नीलीला आपल्या शेजारणीशी बोलायचं होतं. तिला काही सांगायचं होतं. बरंच ऐकायचं होतं. कोच्चुरामनचं आणि आपलं प्रेम कसं जमलं, आपल्या

अंगणातून त्याच्याकडं पाहून ती कशी हसायची. त्यांच्या दोन कुटुंबात त्यामुळं कशी भांडणं झाली आणि त्यांना ह्या सर्व प्रकरणामुळं किती त्रास झाला आणि शेवटी नाईलाजानं त्यांना कसं घर सोडावं लागलं हे सगळं खरं म्हणजे तिला कोणालातरी सांगायचं होतं. शेजारपाजारच्या लोकांकडून देखील ते कसे रहातात, त्यांच्या अडचणी कोणत्या आहेत हे तिला जाणून घ्यायचं होतं. अखेर ती एक स्त्री होती. तिला लोकात मिळून मिसळून वागायलाच हवं होतं.

पण तिच्याशी बोलणार कोण ? तिच्याकडंच जर कोणी आलं नाही तर ती कोणाकडं जाणार ? कोच्चुरामनची गोष्ट निराळी होती. कारखान्यात गेल्यावर तो तिथल्या कामगारात मिसळू शकत होता. त्यांच्याशी गप्पा मारू शकत होता. पण बिचारी नीली काय करणार ? कधीकधी साहेबाच्या बंगल्यावर जाऊन ती काम करायची. पण त्यांच्याशी ती काय गप्पा मारणार ? ती बडी माणसं होती. ते तिचं काय ऐकणार ? त्यामुळं हळूहळू नीलीला एकटेपणा असह्य होऊ लागला.

शेजारच्या घरी नेहमी ख्रिस्ती धर्मप्रचारक यायचे. पुरुष यायचे आणि स्त्रियाही यायच्या. कधीकधी स्त्रिया. त्यातील स्त्रिया नीलीच्या झोपडीत डोकावायच्या आणि नीलीकडं बघून हसायच्या. या बायका कुठून येतात आणि का येतात हे नीलीला काहीच माहीत नव्हतं. पण त्या घरोघर जातात एवढंच तिला माहीत होतं.

एक दिवस दोघीजणी तिच्याकडं पाहून हसल्या तेव्हा तिने त्यांना विचारलं, "तुम्ही माझ्याकडं का येत नाही ?"

मग त्या तिच्याकडं गेल्या. त्यांनी प्रेमानं तिची चौकशी केली. तिनं त्यांना आपल्या झोपडीत बोलावलं. त्या निःसंकोचपणं आत गेल्या. तिनं पसरलेल्या चटईवर बसल्या. तिला त्यांनी अनेक प्रश्न विचारले आणि मग बांध फोडून पाणी वहावं तशी ती बोलू लागली. तिनं सगळं सगळं सांगून टाकलं.

त्यांनी सहानुभूतीपूर्वक सर्व ऐकून घेतलं. त्या दोघांसाठी त्यांनी प्रार्थना केली. बायबलमधला काही भाग वाचून दाखविला. आणि पुढे उपदेश करून त्या तिला म्हणाल्या, "पापातून मुक्त व्हायचं असेल तर महात्मा येशूचा मार्ग अवलंबला पाहिजे."

या बोलण्यातून नीलीला एक आश्वासन मिळालं. तिला जे सांगायचं होतं ते सांगून झालं होतं. आपली जी प्रेमकहाणी साऱ्या जगाला ऐकवायची होती

ती त्यांना तिनं ऐकवली. तिला अजूनही काही त्यांना सांगायचं होतं. पण पुन्हा येण्याचं आश्वासन देऊन त्या दोघी निघून गेल्या.

त्या दिवशी संध्याकाळी कोच्चुरामन जेव्हा कारखान्यातून परत आला तेव्हा नीलीनं या दोघी उपदेशिका येऊन गेल्याचं त्याला सांगितलं. तेव्हा कोच्चुरामननं विचारलं, "त्या परत येतील का ?"

"हो, तसं त्या म्हणाल्या आहेत."

—नीलीच्या अस्वस्थतेचं कारण कोच्चुरामनला माहीत होतं, म्हणून उपदेशिका येऊन गेल्याचं कळल्यावर त्याला खूप आनंद वाटला. त्यानं तिला पुन्हा एकदा त्यांची भेट घ्यायला सुचवलं. इतकंच नव्हे तर त्याचे स्वतःचेही विचार बदलू लागले.

अशा तऱ्हेनं काही दिवस गेले. एक दिवस कोच्चुरामन कामावरून घरी परत आला तो त्याला झोपडीच्या आत एक चित्र लावलेलं दिसलं. जगाच्या पापमुक्तीसाठी स्वतः सुळावर चढलेल्या येशूचं ते चित्र होतं. कोच्चुरामन त्या चित्राकडं टक लावून पाहू लागला. येशूच्या हातापायातून आणि छातीतून रक्त गळत होतं. काटयांचा मुकुट घातलेलं त्याचं मस्तक झुकलेलं आणि थकलेलं होतं. ते पाहिल्यावर कोच्चुरामनच्या डोळयातून पाणी आलं.

त्या दिवसानंतर नीली रोज संध्याकाळी त्या चित्रापुढं मेणबत्ती लावायची. दोघंजण त्या चित्रासमोर बसायचे, आणि भजन म्हणायचे.

येशूच्या मार्गानं जायचा दोघांनीही निश्चय केला.

दुसऱ्या दिवशी सकाळी कोच्चुरामन वरीदुसाहेबाच्या बंगल्यावर गेला. परत आल्यावर तो नीलीला म्हणाला,

"साहेब म्हणाले, तुम्ही जे करत आहात ते बरोबर आहे."

"काय बरोबर आहे ?"

"येशूच्या मार्गानं जाणं आपलं कर्तव्य आहे."

कोच्चुरामननं आणि नीलीनं मग ख्रिस्ती धर्मात प्रवेश केला. आता कोच्चुरामन 'वर्क्कि' झाला आणि नीली झाली 'एली'.

## [४]

नारळाच्या शेंड्यांची चटई विणण्यात वक्कि तरबेज झाला. त्याच्या विणण्याला वेग होता आणि सौंदर्यही होतं. तो जास्त काम करीत असे त्यामुळे त्याला मजुरीही जास्त मिळायची. वरीदुसाहेबाचा तो आवडता कामगार होता त्यामुळं कामगारांतही त्याचं विशेष स्थान होतं.

वरीदुसाहेब आपली जमीन पहायला किंवा तिथल्या माणसांना भेटायला सहसा जात नसत. प्रत्येक कामासाठी त्यांनी वेगवेगळी माणसं ठेवली होती. पण एक दिवस वरीदुसाहेब सहज फिरत फिरत वक्कींच्या झोपडीत गेले. वक्कींचं आणि एलीचं त्यांनी क्षेमकुशल विचारलं. खोल्या पाहिल्या आणि मग त्यांनी सुचवलं की ही झोपडी याहून मोठी आणि सुंदर हवी. झोपडीला कुलूप लावता आलं पाहिजे. त्यासाठी लागेल ते साहित्य त्यांच्याकडून मुक्त हस्तानं पुरवलं जाईल !

साहेबांना पाहिल्यावर आजूबाजूचे लोक त्यांना पहायला आणि नमस्कार करायला वक्कींच्या अंगणात जमले. पण साहेब कुणाच्याच घरी गेले नाहीत. तिथं बसूनच त्यांनी सर्वांचं कुशल विचारलं. या घटनेनं शेजाऱ्यापाजाऱ्यांत एलीची आणि वक्कींची प्रतिष्ठा वाढली. मग मात्र शेजारणी एलीकडं येऊ लागल्या, तिला आपल्या घरी बोलावू लागल्या.

वक्कींनं सुंदर झोपडी बांधली. बांबूच्या तट्ट्यांनी बनविलेल्या त्या झोपडीला खिडक्या दरवाजे सर्व काही होतं. स्वयंपाकघराशिवाय आता आणखी दोन खोल्या होत्या. पुढं एक रुंद व्हरांडा होता आणि मागं एक छोटी खोली. येशूच्या चित्राला त्यांनी चांगली फ्रेम केली. आणि रोज मेणबत्ती लावून ते त्याची प्रार्थना करीत. दर रविवारी चर्चला जात.

एलीला दिवस गेले. तिनं एका मुलाला जन्म दिला. अंतोणि असं त्याचं नाव ठेवलं.

डोंगऱ्यातल्या झऱ्याप्रमाणं त्या कुटुंबाचं जीवन चाललं होतं. त्यात दुःख नव्हतं. कारखाना आणि घर याशिवाय तिसऱ्या गोष्टीचा वक्कि विचार करीत

नसे. दुसऱ्या कुठल्या गोष्टीचा विचार करायला किंवा कुणाच्या भानगडीत पडायला त्याला सवडच नसायची. कारखान्यात मन लावून काम करायचं आणि घरी आलं की बायकोमुलाच्या मुखाकडं पहायचं—बस् ! एवढ्यासाठीच त्याला वेळ होता आणि त्यातच त्याला आनंद होता !

दोन वर्षांनी एलीला पुन्हा दिवस गेले. पुन्हा मुलगाच झाला. त्याचं नाव ठेवलं रोक्कि.

एली आपल्या सगळा वेळ मुलांचं संगोपन आणि नवऱ्याची सेवा यात घालवी. वास्तविक वर्क्कीला तिची सेवा नको असायची. पण घरी आल्यावर वर्क्कीनं काही काम केलेलं एलीला आवडायचं नाही. आठवडा अखेर जी मजुरी मिळायची ती वर्क्कि एलीकडं द्यायचा. एली प्रत्येक पै न् पै चा सदुपयोग करायची.

बाहेर मात्र कोलाहल सुरू झाला होता. सामाजिक आणि राजकीय वातावरण बदलायला लागलं होतं. वर्क्कि तिकडं लक्ष देत नव्हता आणि द्यायची त्याची इच्छाही नव्हती.

कारखान्यात आणि बाहेर कामगारांची कुरकूर आणि बडबड सुरू झाली होती. आपले हक्क आणि पगार याबाबत ते बोलत पण वर्क्कि ते ऐकून न ऐकल्या-सारखं करायचा. त्याला जे काही मिळायचं त्यात तो संतुष्ट होता. हक्क वगैरे गोष्टी तर त्याला माहीतच नव्हत्या.

मिस्त्री आणि मुन्शी यांच्याबद्दल कामगार काहीबाही बोलायचे तेव्हा वर्क्कि गप्प बसायचा. पण वरीदुसाहेबांबद्दल कुणी बोलायला लागलं तर मात्र त्याला ते सहन व्हायचं नाही, लगेच तो म्हणायचा, "अरे, मालक किंवा साहेब कुणाला म्हणतात माहीत आहे ? मालक हा देवासमान आहे. तो आमचं रक्षणही करतो आणि प्रसंगी तो आम्हाला शिक्षाही देतो. माहीत आहे ?"

एलीचं तिसरं बाळंतपण पाच वर्षांनी आलं. या खेपेस मुलगी झाली. तिचं नाव ठेवलं ॲना.

अंतोणि दिसायला वर्क्किसारखा होता आणि चौकस बुद्धीचा होता. त्याला सगळ्या गोष्टींची माहिती हवी असायची. एखादा कागद जरी हाती आला तरी तो वाचल्याशिवाय रहात नसे. त्याची वागण्याची तऱ्हा पाहिली की असं वाटायचं की कसला तरी सारखा विचार करतोय् ! कुणीही त्याला भेटू दे, त्याला दोनचार प्रश्न विचारल्याशिवाय अंतोणीला रहावयाचंच नाही.

रोक्कि त्याच्या अगदी उलट होता. तो भांडखोर होता. शेजारी कुठंही गेला तरी भांडून यायचा. त्याच्याबद्दल शाळेतून रोज तक्रारी यायच्या. मग चिडून एली त्याला बडवायची. पण वर्क्कीला मात्र मुलांना मारलेलं मुळीच आवडायचं नाही.

ॲना आईसारखी होती. अर्थात् आईइतकी गोरी नव्हती, पण गहूवर्णी होती. तिचे डोळेही आईसारखे होते. पण तिच्या डोळ्यात एक प्रकारचं कारुण्य दिसत असे. तिला भजनं म्हणायला आवडायची. क्रूसावर टांगलेल्या येशूच्या चित्राकडं ती तासन् तास पहात रहायची. त्यावेळी तिचे डोळे भरून आल्यासारखे दिसत. कधी कधी ती आभाळाकडं बघत रहायची. जणू कुठलं तरी करुण हृदय निरखते आहे !

अंतोणि पाचवीत, रोक्कि तिसरीत गेला. ॲनाला आता कुठं अक्षरओळख होऊ लागली होती.

कौटुंबिक परिवाराचा प्रवाह आता रुंद आणि खोल होऊ लागला होता. पाच प्राण्यांची भूक भागविण्यासाठी जेवण हवं होतं. त्यांना नेसण्यासाठी कपडे हवे होते. याशिवाय अंतोणि आणि रोक्कि या दोघांचा शिक्षणाचा खर्च होताच. वर्क्कीला जी मजुरी मिळत होती त्यात एवढ्या सगळ्यांचं भागणं कठीण होतं. मुलांना हवं म्हणून आईबापांनी आपलं खाणं कमी केलं. पण त्यामुळं त्यांची प्रकृती बिघडायला लागली. वर्क्कीला आता पूर्वीसारख्या भराभर चटया विणता येईनात. त्यामुळं त्याची मजुरी कमी व्हायला लागली.

कारखान्यातील कामगारांची कुरकूर आणि बडबड चालूच होती. तिचे प्रतिध्वनी आता त्याच्या घरात उमटू लागले. ते प्रतिध्वनी आता चहाची दुकानं, पानाची दुकानं असं करीत करीत सर्वत्र पसरू लागले. त्यात असा एक आवेग होता की त्याचं कारण कोणाला सांगता येत नव्हतं. काही लोक मिस्त्रींना शिव्या द्यायचे तर काही लोक मुनशींना द्यायचे.

काहीजण मॅनेजरवर आक्षेप घ्यायचे तर काहीजण मालकालाच दोष द्यायचे. रोग कोणता आहे ते रोग्यालाच माहीत नव्हतं. रोग जाणणारा वैद्य नव्हता.

औसेपला दोन मुलं होती. मतायि आणि सैमन. ते दोघेही कारखान्यात कामाला होते. दोघेही वेलायुधनचे मित्र होते. कारखान्यातून परत आल्यावर तिघंजण वेलायुधनच्या अंगणात गप्पा मारायला जमायचे. एक दिवस वेलायुधन तावातावाने म्हणाला, "आमच्या भल्यासाठी साहेबानं कारखाना काढला असं

म्हणतात. पण पाहिलं तर साहेब मोठे होत चालले आहेत आणि आम्ही मरतो आहोत !"

घरात बसलेल्या वर्कीनं हे ऐकलं तेव्हा तो ओरडून म्हणाला, "वेलायुधन, देवाची निंदा करू नकोस"

तेवढ्यात अंतोणि धिम्या आवाजात म्हणाला, "बाबा, त्यांनी खरं सांगितलं तर तुम्ही का रागावता ?"

"पोरा, काय म्हणालास तू ?" वर्कीनं विचारलं.

"मी असं म्हणत होतो की त्यांचं म्हणणं बरोबर आहे."

"हे बरोबर नाही. आपले मालक हे देवासमान आहेत."

अंतोणीनं नकारार्थी मान हलविली. पण बोलला मात्र नाही. वडिलांशी वादविवाद करण्याची त्याची इच्छा नव्हती.

सातवी पास झाल्यावर अंतोणीनं वडिलांना विचारलं, "बाबा, आता मी काम करायला लागू का ?"

वर्कीनं रुकार दिला. रोविकपण कामावर जाऊ लागला. त्याला तशी संमती दिल्यावर वर्कि म्हणाला, "आता पूर्वीसारखं माझ्या हातून काम होत नाही."

"आता मुलं मिळवतील आणि वडिलांना खायला घालतील." एली म्हणाली.

अंतोणि आणि रोविक कामावर जायला लागले. ते दोघेही वर्कीचे मुलगे होते. त्यामुळं कारखान्यात त्यांना विशेष स्थान होतं. ते लवकर काम शिकले. त्यांना मजुरी मिळायला लागली. जे काही मिळायचं ते आपल्या आईजवळ ते द्यायचे.

ॲना शाळेत जायची. ती सर्वांची लाडकी होती. आईबापांची आणि भावांची पण. तिला छान छान कपडे घालून ते शाळेत पाठवायचे. तिचा हट्ट आधी पुरवला जाई. ज्यादिवशी पगार मिळायचा त्यादिवशी वडील आणि भाऊ तिला द्यायला काहीतरी आणायचेच. पण काही खायला मिळालं तरी एकटीनं न खाता, सर्वांना वाटून उरेल ते खाण्याचा ॲनाचा स्वभाव होता.

आई वडील, भाऊ आणि क्रूसावरचा ख्रिस्त एवढंच तिचं जग होतं. ती शाळेत जायची पण तिला कोणी मित्रमैत्रिणी नव्हत्या. ती एकटीच शाळेत जायची आणि शाळेतून यायची.

अंतोणि नि रोविक या दोघांचे पुष्कळ मित्र होते. सकाळी कांजी पिऊन ते

कारखान्यात जायचे. दुपारी पुन्हा घरी येऊन कांजी प्यायचे. रात्री उशीरा घरी यायचे.

एली मुलांना जेवण वाढायला त्यांची वाट पहात असायची. जेवण झाल्यावर रोक्कि व्हरांड्यात झोपायचा, अंतोणि मात्र रॉकेलचा दिवा लावून वाचत रहायचा. कधीकधी वर्क्कि मध्येच उठून विचारायचा—

"तू एवढं काय वाचतोस ?"

अंतोणि काहीच उत्तर द्यायचा नाही. दुसऱ्यांकडून आणलेली वर्तमानपत्रं आणि मासिकं वाचत रहायचा.

त्या काळात मिस्त्री लोकांनी मजुरांना शिव्या देणं किंवा मारणं ही एक साधी गोष्ट होती. कधीकधी स्वतःच्या इच्छेनुसार तर कधी कारखान्यातल्या अधिकाऱ्यांच्या आदेशानुसार ही मारपीट चालायची.

एक दिवस सैमन चटई विणत होता. अचानक मिस्त्री मागून आला आणि त्याने त्याच्या तोंडावर एक थप्पड मारली. सैमनला कसंतरीच झालं आणि तो खाली पडला. ही अगदी साधी गोष्ट होती म्हणून कोणीच आपल्या जागेवरून हललं नाही.

लगेच मत्तायि चटई विणणं सोडून धावत आला. आपल्या भावाला त्यानं धरलं आणि मिस्त्रीला विचारलं, "मिस्त्री याला का मारलं ?"

"तुला पण पिटणार आहे, बदमाष !" मिस्त्री गुरगुरला.

"मिस्त्री का मारलंस, सांगा ना ?" मत्तायीनं पुन्हा नम्रपणे विचारलं.

मग मिस्त्रीनं मत्तायीला एक थप्पड लगावली. तोही चक्कर येऊन खाली पडला.

अंतोणि, रोक्कि दोघंही तिथंच विणत होते. अंतोणि उठला आणि मिस्त्रीच्या दिशेनं निघाला. रोक्कीही त्याच्या पाठोपाठ. अंतोणि गंभीर झाला होता. तरीही नम्रता न सोडता त्यानं मिस्त्रीला विचारलं, "कुत्र्याप्रमाणं माणसाला काय मारता ?"

"इथं माणूस कोण आहे? नमकहरामाना कोणी माणूस म्हणेल का? कुत्तरडे कुठले !"

आता मत्तायि आणि सैमन दोघेही उठून उभे राहिले. मत्तायीनं विचारलं, "आम्ही कुठली नमकहरामी केली ?"

"तुम्ही कुणाचं मीठ खाता माहीत आहे ?"

"कुणाचं मीठ खातो ? मिस्त्रीजी सांगा तर खरं—" वेलायुधननं पाठीमागून विचारलं.

"आजपर्यंत काय माहीत नसताना खात होता ?"

"माहीत असूनच खात होतो. आम्ही जे खातो ते आमच्या मेहनतीचं फळ आहे." हा आवाज अंतोणीचा होता. त्याचे शब्द आसमंतात घुमत राहिले.

"काय तुला सुद्धा थप्पड पाहिजे का ?" मिस्त्रीनं ओरडून विचारलं, "नमकहराम, कुत्तरडे कुठले !" असं म्हणून मिस्त्रीनं विचारलं, "एवढा मोठा घोडा झालास तरी माणूस आणि कुत्रा यातला फरक तुला कळत नाही का ?"

मिस्त्रीनं हात उगारला आणि तो अंतोणीवर प्रहार करणार तोच रोक्कीनं मिस्त्रीचा हात धरून ओढला.

"काय मिस्त्री, काय झालं ?" वर्क्कीनं धावत धावत येऊन घाबरत घाबरत विचारलं रोक्कीच्या हातून त्यानं मिस्त्रीचा हात सोडविला, आणि त्याची माफी मागितली. "पोरांना काही समजत नाही. त्यांना माफ करा." वर्क्कि म्हणाला.

"त्यांची वेळच्यावेळी कानउघाडणी केली नाही त्यामुळं ते असे नमकहराम झाले." मिस्त्री उद्‌गारला.

"क्षमा करा मिस्त्री, क्षमा करा." वर्क्कीनं याचना केली.

मग कुणी काही बोललं नाही. अंतोणीनं नुसता हूं असा उद्‌गार काढला. रोक्कीनं आपला हात जरा खालीवर केला. वेलायुधननं पुन्हा एकदा मिस्त्रीकडं वळून पाहिलं. मतायि आणि सैमननं सुस्कारा सोडला. ते सगळे आवाज तिथं घुमत राहिले.

त्यादिवशी रात्री अंतोणि आणि रोक्कि घरी आले तेव्हा मध्यरात्र उलटली होती. एली आणि वर्क्कि दोघेजण मुलांची वाट पाहत होते. आणि त्यांची जेवणं झाल्याशिवाय त्यांना काही बोलायचं नाही असं एलीनं वर्क्कीला बजावलं होतं.

जेवण झाल्यावर रोक्कि आपल्या नेहमीच्या जागेवर झोपला. अंतोणि दिव्याच्या प्रकाशात वाचू लागला. मग वर्क्कि रोक्किजवळ गेला. त्याच्यापाठोपाठ एलीपण. मग अंतोणीनं विचारलं, "तुम्हाला झोप येत नाही का ?"

"कशी झोप येणार ? मुलं बिघडल्यावर आईबापांना कधी झोप लागेल का ?"

वर्क्कि थरथरत होता व त्याच्या तोंडून कसेबसे शब्द येत होते.

"बाबा, असं काय म्हणताय् ?" रोक्कीनं उठून विचारलं, "आम्ही कोणती चूक केली ?"

"तू मिस्त्रीचा हात का ओढलास ?"

"बाबा, माझ्या भावाला मिस्त्री मारायला लागला तर मी काय गप्प राहून पहात बसू ?"

"मी अंतोणीला मारलं तर माझा हात धरशील का ?"

"बाबा, तुम्हाला मला मारायचं असेल तर खुशाल मारा. मला तुम्ही जर मारलंत तर रोक्कि मधे नाही यायचा !" असं म्हणत अंतोणी उठला आणि बापापुढं खाली मान घालून उभा राहिला.

"तुम्हाला वाटलं तर तुम्ही खुशाल मारा —" एली मध्येच म्हणाली, "पण त्या मिस्त्रीनं माझ्या मुलांना का म्हणून मारायचं ?"

"बाबा, आम्हाला खुशाल मारा. आम्ही हूं की चूं करणार नाही." रोक्कि वर्क्कीच्या समोर येऊन उभा राहिला.

मग कुणाच्या तोंडून काहीच शब्द उमटला नाही. डोळे पुसत वर्क्कि आत निघून गेला. आणि त्याच्या पाठोपाठ एली.

## [५]

वरीदु साहेबाच्या कॉयरच्या कारखान्यापुढं तीन रस्ते एकत्र येतात. शहरातून येणारा रस्ता तिथून पुढं दोन भागात जातो. एक वायव्येला आणि दुसरा ईशान्येला. हे तीन रस्ते जिथं एकत्र येतात तिथं चहाची दुकानं आहेत. पानाची दुकानं आहेत. कपड्यांची आहेत आणि शिंप्याची पण आहेत. त्या दुकानांपैकी एक चहाचं दुकान कुट्टप्पनचं होतं.

कुट्टप्पनचं चहाचं दुकान इतरांच्या चहाच्या दुकानापेक्षा जरा वेगळं होतं. तिथं चहाबरोबर वर्तमानपत्र वाचण्याची आणि गप्पा मारण्याची सोय होती. कुट्टप्पन काही साप्ताहिकांचा आणि मासिकांचा वर्गणीदार होता. त्याला पुस्तकं वाचण्या-

चाही नाद होता. अर्थात् त्यामुळं त्याच्याजवळ पुस्तकांचाही संग्रह होता. एवढंच नव्हे तर चहा प्यायला येणाऱ्या प्रत्येकाला तो बोलायला लावायचा. असं करून धंद्याला त्याला फायदाच व्हायचा. नुकसान व्हायचं नाही.

वरीद् साहेबाच्या आणि आसपासच्या कारखान्यातले पुष्कळ कामगार कुट्टप्पनच्या दुकानात चहा प्यायला यायचे. त्याशिवाय इंग्रजांच्या कारखान्यात काम करणारे मजूरही संध्याकाळी कामावर येताना कुट्टप्पनच्या चहाच्या दुकानात चहाबरोबरच वर्तमानपत्र वाचायला आणि गप्पा करायला यायचे. अंतोणी, रोक्कि, वेलायुधन, मत्तायि, सैमन, अच्युतन, जोसेफ—सर्वजण रोज संध्याकाळी तिथं चहा प्यायचे आणि पेपर वाचायचे. वर्तमानपत्रात आलेल्या बातम्यांवरून कारखान्यात मिळणाऱ्या मजुरीबद्दल त्यांच्यात नेहमी वादविवाद व्हायचे. काही काही वेळेस हे वादविवाद गंभीर स्वरूप धारण करायचे.

आतापर्यंत दोनदा त्यांच्या चर्चेनं गंभीर स्वरूप धारण केलं होतं—एकदा शंकूची आई गेली तेव्हा आणि दुसऱ्यांदा भार्गवला कारखान्यात येऊ दिलं नाही तेव्हा ! दुकानाची पुढची दारं लावली तरी फटीतून आतला उजेड दिसायचा. आतली कुजबूजही ऐकू यायची. ज्यादिवशी शंकूची आई गेली. त्यादिवशी पोलिसांनी शंकु, अच्युतन आणि जोसेफ तिघांनाही चौकीवर नेऊन खूप मारपीट केली होती. आणि दुसऱ्या दिवशी खटला वगैरे न भरता त्यांना सोडून दिलं होतं. त्यादिवशी कुट्टप्पनच्या दुकानात मध्यरात्रीपर्यंत उजेड दिसत होता आणि कुजबूज ऐकू येत होती. अंतोणि आणि पद्मनाभन गप्प बसले होते. इतर लोक दबल्या आवाजात बोलत होते. कधी कधी रोक्कीचा आवाज एकदम मोठा व्हायचा. तो एकदम म्हणायचा, "आपण जर घाबरून गप्प बसलो तर पोलीस आपल्या डोक्यावर बसतील. उलट जर आपण जशास तसे वागलो तर पोलीस आपल्याला मारायला यायचेही नाहीत !"

"आम्ही पण मारणार आहोत हे त्यांना कसं कळणार ?"

"कसं समजणार, आम्ही पण नेम धरून त्यांना मारू तेव्हा कळेल त्यांना !"

"रोक्कि, तुला काय वेडबिड लागलंय का ?" वेलायुधननं विचारलं.

"मी वेडा नाही. जे मार खातात ते वेडे आहेत. मार खाऊन ओरडायचं हा वेडेपणा नाही तर काय ?"

इतका वेळ मान खाली घालून बसलेला पद्मनाभन नकारार्थी मान हलवून म्हणाला, "असं होणार नाही. आपण मार नाही खाणार."

अंतोणीनं पद्मनाभनकडं पाहिलं. त्याचा दबलेला आवाज घुमत होता —

"जशास तसं केलं तर ?"

"केलं तर काय होणार आहे ?" रोक्कीनं विचारलं.

"तसं करायचं जर आपण ठरवलं तर तलवारीच्या धारेवरच आपण आपली मान ठेवलीय् असं समजा."

"तर मग मारहाणीपासून वाचण्यासाठी आम्ही काय करायला पाहिजे ?" सैमननं विचारलं.

"करणार काय —" पद्मनाभन हलकेच म्हणाला, "आपण एक झालं पाहिजे."

"बरोबर आहे. बरोबर आहे." अंतोणि मोठ्याने म्हणाला. "नारळाच्या शेंड्या हवेत उडतीत पण वळलेली दोरी उडणार नाही !"

"आम्ही शेंड्यांसारखे आहोत. आम्ही दोरी झालं पाहिजे !" पद्मनाभन म्हणाला.

"पण आपण एक कसे होणार ?" सैमननं विचारलं.

"आपण भांडणं विसरून एक झालं पाहिजे." मत्तायि उत्तरला.

"म्हणजे त्याला असं विचारायचंय की नारळाच्या शेंड्या स्वत: दोरी होणार की काय ?" वेलायुधननं शंका काढली.

"हो. शेंड्या इकडं तिकडं पसरलेल्या आहेत. त्या एक करायच्या."

"पण ते काम कोण करणार ?"—हा महत्त्वाचा प्रश्न रोक्कीनं विचारला होता.

त्याचं कोणी उत्तर दिलं नाही. सगळेजण खाली माना घालून गप्प बसले. मांजराच्या गळ्यात घंटा बांधायचीय खरं. पण कोणी बांधायची ?

एक व्हायचं, एक व्हायचं. पण कसं ?

त्या नीरव शांततेत हे प्रश्न उभे राहिले. दुकानाच्या फटींतूनही ते बाहेर गेले.

'आपल्या सर्वांना एक झालं पाहिजे.' ही एक घोषणा झाली. ती घोषणा दुसऱ्या दिवशी इतर कारखान्यांत पसरली, चहाच्या आणि पानाच्या दुकानांत दुमदुमली आणि तिचे प्रतिध्वनी मालकाच्या कानापर्यंत जाऊन पोहोचले.

काही दिवस गेले. एक दिवस अंतोणि, रोक्कि, वेलायुधन, मत्तायि आणि सैमन एक कसं व्हायचं असा विचार करीतच कारखान्यात पोहोचले. पण ऑफिसच्या समोर असलेल्या मोकळ्या जागेत त्यांना एकदम गर्दी दिसली. मग ते तिकडे गेले.

ऑफिसपासल्या नोटीस बोर्डावर इंग्रजीत टाईप केलेली एक नोटीस लावलेली होती.

"ते काय आहे ?" रोक्कीनं विचारलं. "त्या कागदावर काय लिहिलंय ?"

एवढयात, "तुम्ही लोक इथं का गर्दी करून थांबले आहात. असं मोठयानं विचारित मिस्त्री तिथं येऊन पोहोचला.

"मिस्त्री, त्या कागदावर काय लिहिलंय ?" वेलायुधननं विचारलं.

"कागदावर लिहिलंय की कारखाना बंद केला जाणार आहे."

"कारखाना का बंद करणार ?" मत्तायीनं विचारलं.

"छोटे लाल साहेबांचं नुकसाना होतंय म्हणून !"

"मोठया साहेबांना जर फायदा होतो तर छोटया साहेबांचं नुकसान का होतं ?"

"पण असं विचारणारा तू कोण ?"

मिस्त्रीच्या प्रश्नाला उत्तर न देता वेलायुधन म्हणाला, "मत्तायि, मिस्त्रीच्या बोलण्यावरून आपल्याला काही कळणार नाही. आपण छोटया मालकांना विचारू."

"त्यांना काही विचारायचं नाही. इथं लिहिलंय की छोटया साहेबांकडे कोणी तक्रार न्यायची नाही."

"मग आमचं दु:ख कोणाला सांगायचं ?" म्हाताऱ्या शौरीनं विचारलं.

"मालकाला काही सांगायचं नाही. जर काही विचारायचं असेल तर मला विचारा."

"वा ! तुम्हाला विचारायचं म्हणजे कोल्ह्याला कोंबडी पाळायला सांगण्यासारखंच आहे."

मिस्त्रीनं रोक्कीकडं रागानं पाहिलं. अंतोणीनं उदास होऊन विचारलं, "खरंच का टाळेबंदी होणार आहे ?"

"मग काय होणार ? नुकसानीत कारखाना थोडाच चालविणार ?"

"नुकसान, नुकसान असं ओरडून काय होणार आहे ?"

"नुकसान आणि फायदा या बाबतीत आणखी कोण सांगणार ? या बाबतीत सांगायचा तुला अधिकार आहे का ?"

"सांगण्याचा अधिकारी फक्त मालकच आहे." अंतोणि मध्येच म्हणाला.

"मग तू कोण आहेस ?"

"मालकांनी जर दिवसाला रात्र असं म्हटलं तर मिस्त्री ते आम्ही मानणार नाही."

"तू नाही मानलंस तर तुझा बाप मानेल ! अरे, समज पाहिजे समज."

"मी मला समज नाही असं दाखविणारं काही बोललो का ?"

"सूर्य रोज उगवावा की नाही कोण ठरवतो माहीत आहे ?"

"कोण ?"

"तेच म्हणतोय मी. समज पाहिजे. तो निर्णय करणारा परमेश्वर आहे. तसंच कारखान्यात फायदा आहे का तोटा आहे हे ठरविणारा मालक आहे."

सर्वजण गप्प राहिले. अंतोणीच्या चेहऱ्यावर एक हास्यरेषा उमटली. आपला जय झाला असं समजून मिस्त्री म्हणाला. "मालक कुणाला म्हणतात माहीत आहे ? खरं म्हणजे तोच परमेश्वर आहे. त्या परमेश्वराचं ऐकाल तर त्यात तुमचं हित आहे." मग ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या आवेशात मिस्त्री म्हणाला, "कारखान्यात नुकसान होतं म्हणून मालक कारखाना बंद करणार आहेत. कारखाना बंद झाला तर तुम्हाला उपाशी मरावं लागेल. मालकाजवळ पुष्कळ रुपये आहेत. तुम्हाला मात्र बायकामुलांसह उपाशी मरावं लागेल. मालकाचं नुकसान आपण होऊ दिलं नाही तर मालक कारखाना बंद करणार नाहीत. तुम्ही जर तसा शब्द दिलात तर मी मालकाच्या पाया पडून विनंती करीन की कारखाना बंद करू नका !"

कोणीतरी काहीतरी विचारील म्हणून मिस्त्रीनं क्षण दोन क्षण वाट पाहिली. पण कोणीच काहीच बोलत नाही असं दिसल्यावर मिस्त्रीनं विचारलं, "तुम्ही कुणी बोलत का नाही ? मालकाचं नुकसान कसं कमी करता येईल ? असं तुम्ही का नाही विचारत ?"

"त्याचं उत्तर तुम्हीच द्या ना मिस्त्री." वेलायुधननं सुचवलं.

"बरं तर. मी सांगतो. रुपयात आठ आणे या प्रमाणात मजुरी कमी केली पाहिजे. तुम्हाला मजुरी देऊन तर मालक बरबाद झाले. मजुरी कमी करणं तुम्हाला मान्य आहे का ?"

आपलं हसू दाबीत अंतोणी म्हणाला, "मिस्त्री, मग कारखाना बंद करा."

"कारखाना बंद केला तर मालकांचं काही नुकसान नाही. तुम्हाला उपाशी मरावं लागेल !"

"आम्ही मरायला तयार आहोत. कारखाना खशाल बंद करा."

मिस्त्रीचा चेहरा एकदम पडला. अंतोणि खोचकपणे हसत कारखान्यात शिरला. बाकी सगळे त्याच्या पाठोपाठ आत शिरले.

त्यादिवशी रात्री वर्क्कि आणि एली कितीतरी वेळ जागेच होते. दु:खी मनानं ते रॉकेलच्या दिव्यासमोर बसले होते. ॲना आईला चिकटून झोपली होती. मजुरी कमी केली जाणार का कारखाना बंद केला जाणार या चिंतेनं त्यांना ग्रासलं होतं. दोघांनी त्याबद्दल खूप तर्कवितर्क केले. शेवटी एली म्हणाली, "मजुरी कमी करायचा डाव दिसतोय हा ! कारखाना बंद करतील असं मला वाटत नाही."

"तसंही असेल." वर्क्कि म्हणाला. मग थोडा वेळ विचार करून वर्क्कीनं सांगितलं, "कदाचित मोठ्या साहेबांना हे सगळं माहीत नसेल."

"हे काय तुमचं बोलणं ? हा बापलेकांचा डाव आहे !"

"असं नको म्हणूस. मोठे मालक म्हणजे परमेश्वर आहत."

"कोण परमेश्वर आहे ?" असं विचारीत म्हातारा औसेप पायऱ्या चढून वर आला. ओसरीवर बसून तो म्हणाला, "तुम्ही परमेश्वरालाही ओळखत नाही, आणि पिशाच्चालाही नाही."

"औसेपभाई, तू असं का म्हणतोस ?"

"ती गोष्टच तशी आहे. मोठ्या मालकांना मी लहानपणापासून ओळखतो. त्याच्या एक एक गुप्त गोष्टी ऐकल्या की असं वाटतं की तो परमेश्वराचा बाप आहे— बरं ते राहू दे. जरा पानसुपारी आणा पाहू."

एलीनं पानदान पुढं आणून ठेवलं. मग पान खात औसेप पुढं म्हणाला," तुम्हाला माहीत आहे त्यानं कारखाना कसा सुरू केला तो ? त्यावेळी मी विणकरी होतो. बड्या साहेबाच्या बापाला लॉटरी लागली. एकूण चारपाचशे रुपये मिळाले. त्या रकमेवर त्यानं कारखाना काढला त्यावेळी कारखाना म्हणजे गोठाच होता. आता मात्र अशी स्थिती आहे की पहिल्या तारखेला बागेतून नारळाची तोड सुरू होते. ती तीस तारखेला संपते. मोठ्या बंगल्यात राहतात. मोटारीतून हिंडतात. हे सर्व कुठून आलं ? आणि आता म्हणतोय की कारखाना नुकसानीत आहे. कारखाना बंद केला पाहिजे. मजुरी निम्मी केली पाहिजे !"

तेवढ्यात अंतोणि आणि रोक्कि वर आले. औसेपनं विचारलं, "मत्तायि आणि सैमन माझ्याकडे आले होते ?"

"हो, आम्ही सगळे बरोबरच आलो." अंतोणि उत्तरला.

"बरं तर. मी जातो." औसेप उठत म्हणाला आणि मग त्यानं विचारलं, "कारखाना बंद करायचं काय झालं ?"

"कारखाना बंद नाही होणार. मजुरी कमी करण्यासाठी केलेलं ते ढोंग होतं !"

"मी तेच म्हणत होते !" विजयी मुद्रेनं एली उद्गारली.

"काय तुम्ही लोकांनी मजरी कमी करायला मंजुरी दिलीत ?"

"छे. आम्ही अशी कबुली कधीच देणार नाही."

"मग मजुरी कमी केली तर ?"

"आम्ही जर एक झालो तर मजुरी कधीच कमी व्हायची नाही." अंतोणि आत्मविश्वासानं म्हणाला.

"काय आपण एक होणार ?"

"एक झालंच पाहिजे." अंतोणि जोरान म्हणाला.

"बरोबर आहे." एवढं बोलून औसेप आपल्या घराच्या दिशेनं निघन गेला.

## [ ६ ]

रडत रडत एली वर्क्कीच्या बाजूला झुकली आणि एखाद्या वाघिणीसारखं खवळून तिनं विचारलं, "काय माझ्या मुलांना मारलं ?"

"एली, तू शांत हो." वर्क्कि आपल्या पत्नीला म्हणाला, "मी त्यांना घेऊन येतो."

"जा, या अंतोणीला आणि रोक्कीला घेऊन या."

"बाबा—" अॅना दीनवाणीनं आपल्या पित्याला संबोधून हुंदके देत होती.

"मुली, मी त्यांना बोलावून आणतो. तू गप्प बैस."

"जा. माझ्या मुलांना घेऊन या. तुमच्या परमेश्वराला जाऊन सांगा की माझी मुलं पोलिसांनी पकडून नेली आहेत." संपप्त एली अजून बोलतच होती.

पायऱ्या उतरून वर्क्कि चालायला लागला.

"मी पण येते—" असं म्हणून एली त्यांच्या पाठोपाठ धावली.

तिन्हीसांजा होऊन गेल्या होत्या. वरीदु साहेबाच्या बंगल्याच्या दारावर रख-वालदार उभा होता. पूर्वी तिथं असा कुणी उभा नसे.

पुढं एली आणि मागं वर्क्कि असे दोघंजण आत घुसणार होते. तोच रखवालदार ओरडला, "खबरदार, आत जाल तर !"

एलीनं पुढं टाकलेलं पाऊल मागं घेतलं नाही. तिनं विचारलं, "कुणाचा हुकूम आहे ?"

"हा माझा हुकूम आहे. थांबा तिथंच."

"आणि आत आम्ही घुसलो तर ?" वर्क्कीनं विचारलं.

"मी घुसू देणार नाही." रखवालदार उत्तरला.

"मी वर्क्कि आहे. मालकाला देवासमान मानणारा वर्क्कि !"

"तू. वर्क्कि असलास तर रस्त्याच्या त्या बाजूला हो !" चौकीदार तिर-स्कारानं म्हणाला.

"साहेबांना मी देवासमान मानतो."

"पण तू केवळ मानून चालणार नाही. तुझ्या मुलानं मानलं पाहिजे ना !"

"ईश्वरानं देखील आम्ही गरीब आहोत हे ओळखलं पाहिजे."

"तू गप्प बस. मी सगळं सांगतो. "वर्क्कीनं एलीला गप्प बसवलं आणि तो चौकीदाराला म्हणाला, "मालकांना मला माझे दु:ख सांगायचंय. तू आत जाऊन सांग की वर्क्कि आणि एली बाहेर उभे आहेत."

"जा. आपला रस्ता सुधार." रखवालदार ओरडला.

वर्क्कीनं त्यावर विश्वास ठेवला नाही. मालकाला तो परमेश्वर मानतो. पण तरीदेखील त्याला भेटून आपलं दु:ख सांगणं वर्क्कीला शक्य होत नाही. त्यानं व्याकुळ होऊन विनवणी केली--

"अंतोणी आणि रोक्कि हे माझे दोन्ही मुलगे पोलिसांनी पकडले आहेत. माल-कांना भेटून मला हे सगळं सांगायचं आहे. आमच्यावर दया करा, आम्हाला आत जाऊ द्या."

"इथून चालते व्हा !" रखवालदाराचा आवाज चढला.

"आम्हाला आमची मुलं मिळाल्याशिवाय आम्ही इथून हलणार नाही." एलीनंही आवाज चढवला.

"तू इथंच थांब. मी आत जातो." वर्क्कि एलीला मागं ढकलून पुढं निघाला.

तशी रखवालदाराचा लोखंडी पंजा वर्क्कीच्या गळ्याभोवती आवळला गेला—मग एक धक्का आणखी एक लाथ ! वर्क्कि रस्त्यावर गुडघे लटपटून पडला.

"मार, मला पण मार–" एली दारातून घुसत म्हणाली.

रखवालदारानं एलीचा हात पिळला आणि तिलाही रस्त्यावर ढकळून दिलं.

रस्त्यानं जाणारे लोक जमले. पण त्यांच्याजवळ कुणीच आलं नाही. कुणी काही बोललं नाही.

वर्क्कि एलीचा हात धरत कसाबसा लटपटत उठला.

"देवा–देवा !"

मग जमलेल्या गर्दीकडं पाहून रखवालदार म्हणाला, "यांच्या पोरांनी मिस्त्रीला आणि अफसरांना पिटलं आणि आता ही दोघं मालकांना मारायला आलीयत्."

सगळे ऐकत होते. कुणीच काही बोललं नाही.

वर्क्कीनं बंगल्याकडं पाहिलं. बंगल्याच्या खिडकीतून कुणीतरी रस्त्याकडं पहात होतं. वर्क्कीनं ओरडून विचारलं, "तिथं कोण उभं आहे, मालक का ?"

त्याच्या स्वरात राग, अवज्ञा आणि दु:ख यांचं विचित्र मिश्रण झालेलं होतं.

"तुमचा ईश्वर तिथं उभा आहे" एली उत्तरली.

"चल, आपण जाऊ—" वर्क्कीनं एलीचा हात धरून म्हटलं.

कोच्चुणि हे सगळं पहात होता, त्यानं वर्क्कीला विचारलं, "तुम्ही आता जाणार कुठं ?"

"अंतोणि आणि रोक्कि पोलीस चौकीवर डांबून ठेवले आहेत."

"मग तुम्हाला तिकडं गेलं पाहिजे."

"तिकडं जाऊन आम्ही काय करणार ?"

"पण तुम्ही तिकडं गेलात तर परत नाही येणार. तिथं मारपीट चाललीय्. पुलापाशी गेल्याबरोबरच किंकाळ्या ऐकू येतील."

"काय माझ्या मुलांना मारलं ?" असं म्हणत एली वेड्यासारखी धावत सुटली.

चौकीजवळ उभ्या असलेल्या एका माणसानं त्यांना ओरडून सांगितलं, "वर्क्कि भैय्या, तिकडं जाऊ नकोस !"

त्या दोघांपर्यंत त्याचे शब्द पोचलेच नाहीत.

"मारलं, माझ्या मुलांना मारलं ?" चौकीचं दार उघडून आत शिरत एलीनं विचारलं.

"मारा–आम्हाला पण मारा—" वर्क्कि आत घुसत ओरडला.

तीन शिपायांनी त्यांना थांबवलं. तेवढयात आतून आज्ञा आली, "त्यांना नाल्यात फेकून द्या."

क्षणार्धात वर्क्कि आणि एली दोघंही उचलले गेले चौकीसमोरच्या नाल्यात फेकले गेले. नाल्याच्या पलीकडून जाणाऱ्यांनी हे दृश्य पाहिलं. पण कुणी काही बोललं नाही. बोलण्याची कुणाचीच हिंमत नव्हती.

एलीनं वर्क्कीचा हात धरून त्याला उठवलं. त्याचा एक पाय मोडला होता. एलीनं त्याला सांभाळत उठवलं. तो लंगडत लंगडत चालू लागला.

एलीची तर रडण्याचीही शक्ती संपली होती. वर्क्कीला कशीतरी सांभाळत चालत, खुरडत ती आपल्या घराजवळच्या गल्लीत पोहोचली. घराच्या ओसरीवर रॉकेलच्या दिव्यापुढं ॲना कुडकुडत झोपली होती. औसेप अंगणात उभा होता. वेलायुधनची आई हनुवटीवर हात ठेवून आत बसली होती.

घराच्या दाराशी आल्यावर एलीनं हाक मारून म्हटलं, "धरा, धरा यांना."

सगळे धावत आले. आणि त्यांनी एकदम विचारलं, "काय मारलं ?"

"बाबा, "ॲना घरातून धावत आली. आणि वर्क्कीला मिठी मारून रडू लागली.

सगळेजण ओक्साबोक्सी रडू लागले. वर्क्कीला दारापासून उचलून आत ओसरीवर झोपविण्यात आलं.

"काय माझ्या मुलांना पण मारलं ?" औसेपनं विचारलं.

"माझ्या मुलाला पण मारलं ? माझा तर एकुलता एक मुलगा आहे." असं म्हणत वेलायुधनची आई रडू लागली.

कोणीच काही बोलत नव्हतं. एली आणि ॲना वर्क्कीच्या जवळ बसल्या होत्या.

एवढयात पाच सहा माणसं पायऱ्या चढून वर आली. सगळेजण त्यांच्याकडं चकित होऊन पाहू लागले. अच्चुतन, शंकु, पद्मनाभन, जोसेफ, पप्पन सगळे होते. त्यांच्याशिवाय आणखी एकजण होता. दुबळा आणि कृश. तो सर्वांच्या मागं उभा होता.

"माझा मुलगा कुठाय ?" वेलायुधनच्या आईनं रडत रडत विचारलं.

"माझी पोरं मेली का जिवंत आहेत ?" औसेपनं विचारलं. ॲनानं मग हुंदके देत विचारलं, "माझे दोन्ही भाऊ येतील का नाहीत ?"

"सगळे येतील." पद्मनाभन उत्तरला, "मी असं ऐकलंय की त्यांच्यावर खटला होणार नाही. उद्या किंवा परवा त्यांना सोडून देणार आहेत."

"त्यांना मारलं का ?" औसेपनं विचारलं. त्याचं उत्तर कोणी दिलं नाही. अॅनानं ओक्साबोक्सी रडत विचारलं, "माझ्या भावांना पण मारलं ?"

तो हडकुळा माणूस पुढं झाला आणि अॅनाच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाला, "छोटी, तू रडू नकोस. ते उद्या येतील." "हा कोण ?" औसेपनं पद्मनाभनला विचारलं.

"हा आमच्या मदतीसाठी आलाय." जोसेफनं सांगितलं, "शिकलेला आहे. गरिबांना मदत करायला आलाय"

दुबळा वर्क्कीच्या जवळ बसला आणि त्यानं एलीला विचारलं, "काय पाय मोडला ?"

"हो." एलीजवळ केवळ हुंकार देण्याइतकीच शक्ती होती.

"याला इस्पितळात नेलं पाहिजे."

"एक खाट पाहिजे." पद्मनाभन औसेपला म्हणाला. जोसेफ आणि पप्पन औसेपच्या घरी गेले आणि खाट घेऊन आले. सर्वांनी वर्क्कीला खाटेवर झोपवलं. शंकु, पप्पन, जोसफ आणि अच्युतन चौघांनी खाट उचलली आणि पायऱ्या उतरून चालू लागले.

  

घनदाट निबिड अंधार. शांत हवा. हालचाल होती परंतु अंधार कमी झाला नाही.

एक नवी जागृती ! एक चैतन्य ! एक जोश !

हे कसं झालं कुणालाच कळलं नाही. कारखान्यातल्या मार्गांवर ही हालचाल दिसली. चहाच्या दुकानात आणि चौकाचौकात नवं चैतन्य उसळलं. कामगारांच्या घरात त्या चैतन्याचे प्रतिध्वनी उमटू लागले.

'आज ते—उद्या आम्ही !'— सर्वजण कुजबुजत होते.

अंतोणि, रोक्कि, मत्तायि आणि सैमन खोकत, धडपडत कसेतरी चौकीतून बाहेर आले.

वेलायुधनचं निष्प्राण शरीर पोस्टमार्टेम झाल्यावर त्याच्या भावांकडे देण्यात आलं. वेलायुधननं आत्महत्या केल्याचं डॉक्टरांचं सर्टिफिकेट होतं.

वेलायुधनच्या बहिणीनं त्या प्रेताचा स्वीकार केला. वेलायुधनच्या मृत्यूची बातमी ऐकता क्षणी त्याची आई बेहोष होऊन खाली पडली.

'मारून मारून त्याचा प्राण घेतला' सर्वजण आपसात बोलत होते.

त्यानं आत्महत्या केल्याचं डॉक्टरांचं सर्टिफिकेट होतं. तर मग त्या अशिक्षित वेडवळांवर विश्वास कोण ठेवणार ?

तरीसुद्धा वेलायुधनला पोलिसांनी मारपीट करून ठार मारलं. ही बातमी वाऱ्याबरोबर सगळीकडे पसरली. त्याचबरोबर 'आज तो—उद्या आम्ही' अशीही एक भावना पसरत गेली.

संध्याकाळचे पाच वाजून गेले होते. कारखान्याचा भोंगा वाजला. कारखान्याच्या मुख्य दारातून माणसांचे छोटे छोटे प्रवाह रस्त्याच्या दिशेनं वाहू लागले. फिकटलेले डोळे, बसलेले गाल असले अस्थिपंजर.

पण त्यादिवशी मात्र त्यांच्या तेजोहीन डोळ्यात चैतन्याची प्रभा पसरली होती.

कारखान्याच्या दारातून रस्त्यावर वहाणारी माणसांची ती नदी आपल्या उद्दिष्टाच्या दिशेनं निघाली. संध्याकाळ व्हायच्या आत वेलायुधनच्या घराभोवती माणसांचा समुद्र उसळला. त्याच्या घराच्या ओसरीवर वेलायुधनचं फाडून शिवलेलं निष्प्राण शरीर झाकून ठेवलं होतं. त्या शरीराजवळ एलीला चिकटून वेलायुधनची आई पडली होती.

अंगणातल्या एका बाकावर चढून तो दुबळा माणूस माईकमधून मोठ्याने बोलत होता —

"भाई हो, कामगारांच्या स्वातंत्र्यासाठी आणि हक्कांसाठी ज्यानं होतात्म्य पत्करलं त्या भाई वेलायुधनची अंत्ययात्रा आता सुरू होत आहे."

रस्त्यावर लोकांची गर्दी होती. त्या गर्दीतल्या एका माणसानं आपल्या शेजाऱ्याला विचारलं, "तो 'भाई' म्हणून काय म्हणतोय ?"

"ते तसंच आहे. आम्ही सर्वजण भाई भाईच आहोत."

हा प्रश्न अनेकजणांनी विचारला. त्याला अनेकजणांनी उत्तरेही दिली. पण कुणालाच काही समजलं नाही. तो दुबला माणूस मायक्रोफोनवरून ओरडू लागला, "भांडवलशाही मुर्दाबाद !"

अंतोणी, रोक्कि, मत्तायि, सैमन, पद्मनाभन आणि पप्पन या सर्वांनी त्याच्या आवाजात आपला आवाज मिसळला. परंतु त्या माणसांच्या समुद्रातून त्याचा प्रतिध्वनि आला नाही. दुबळा माणूस पुन्हा जोरात ओरडला. "भांडवलशाही मजुरांचं शोषण करते. भांडवलशाही शासनानंच भाई वेलायुधनला मारहाण करून ठार मारलं. भांडवलशाहीचा धिक्कार असो. भांडवलशाही मुर्दाबाद !"

आता मात्र त्या माणसांच्या समुद्रातून प्रचंड आवाज आला, " भांडवलशाही मुर्दाबाद !" अंगणात उभे असलेले लोक एकमेकांना म्हणत होते, "भांडवलशाही वाल्यांना मारलं पाहिजे असंच म्हणत आहेत ना ?"

"मग दुसरं काय ? त्यांनी जसं वेलायुधनला मारलं तसंच आपण त्यांना मारलं पाहिजे !"

वेलायुधनचं प्रेत उचललं गेलं. यात्रा हळूहळू पुढे सरकू लागली.

"भांडवलशाही मुर्दाबाद" आवाज वाढत गेला.

वेलायुधनच्या आईनं क्षणभर डोळे उघडले आणि पुन्हा बंद केले. एलीनं तिच्या मस्तकावरून हात फिरविला.

आणि रोक्कीला खोकला आला. तो सारखा खोकू लागला. त्याला ढास लागली. खोकला थांबल्यावर तो थुंकला—ते रक्त होतं !

## [७]

वर्क्की इस्पितळात होता. त्याच्या पायाला प्लॅस्टर केलं होतं. तो लवकर बरा होईल आणि पूर्वीसारखा चालू शकेल असं डॉक्टर म्हणत होते. त्याच्या शारीरिक जखमा लवकर भरून येणार होत्या. पण मानसिक जखमा भरून येण्याची शक्यता नव्हती. जेव्हा तो आपल्या बायकोला घेऊन निराधार अवस्थेत भटकत होता. तेव्हा वरीदु साहेबांनीच त्याला आश्रय दिला होता. एवढंच नव्हे तर वरीदु साहेबानं त्याला नोकरीपण दिली होती. त्यानं साहेबाच्या धर्माचा सपत्नीक स्वीकार केला होता. आणि हे सगळं कमी पडलं म्हणून की काय तो साहेबाला ईश्वर मानीत

होता. त्याच्या मुलानं देखील साहेबाच्या विरूद्ध बोललेलं त्याला आवडत नसे अशा ईश्वरस्वरूप मालकाकडे तो आपल्या मुलांच्या अपराधाची क्षमा मागायला जातो तेव्हां रखवालदार अडवतो. याची तो कल्पनाच करू शकला नव्हता. आणि त्या दोघांना रखवालदारानं जेव्हा रस्त्यावर ढकलून दिलं तेव्हा साहेब स्वतः खिडकीतून पाहात होता. या घडलेल्या गोष्टीवर त्याला विश्वास ठेवायलाच हवा होता. त्याला असं वाटायला लागलं की ईश्वरानं सैतानाचं रूप घेतलंय किंवा ज्याला आपण ईश्वर मानलं तो खरं तर सैतानच होता ! असह्य दुःख तिरस्कार आणि संतापाच्या भरात एलीनं जे शब्द उच्चारले होते ते त्याच्या कानात घुमत होते—

'तुमचा परमेश्वर पहा तिथं उभा आहे !'

बेहोषीतच मग तो पोलीस चौकीवर गेला होता. आणि जेव्हा पोलिसांनी त्याला नाल्यात फेकला तेव्हा तो अर्धवट बेशुद्धावस्थेत होता. त्यामुळं पाय मोडल्याचंही त्याला कळलं नव्हतं. आणि त्याची चिंताही नव्हती. इस्पितळातल्या खाटेवर तो आता डुलकी घेत होता. एलीचे शद्ब त्याच्या कानात सारखे घुमत होते. दुसऱ्या मजल्यावरच्या त्या खिडकीतून त्या सैतानाची नजर नेहमी दिसत होती. त्याच्याबद्दल वर्क्कीला वाटणाऱ्या विश्वासाचा पार चुराडा झाला होता आणि तो इतका खाली ओघळला होता की त्याला आता सावरणं अशक्य होतं ! ही गोष्ट केवळ त्याच्यापुरतीच नव्हे तर त्याच्या कुटुंबाच्या दृष्टीनंही हानिकारक होती. —किती दयनीय अवस्था ही !

एली आणि ॲना आलटन पालटून त्याच्या उशापायथ्याशी बसत. अंतोणि आणि रोक्कीनं फारच सांगितलं तर त्या घरी जायच्या. असे पंधरा वीस दिवस गेल्यावर ते वर्क्कीला इस्पितळातून घरी घेऊन गेले. त्याला चालणं आता फारसं अवघड नव्हतं पण तरीही तो झोपून राहिला होता. अर्धवट झोपेत तो सारखा चटईवर पडून असायचा. उठायचा नाही की चालायचा नाही !

त्याच सुमारास वरीदु साहेबाच्या कारखान्यातला एक मिस्त्री औसेपकडे आला. त्यावेळी मत्तायि आणि सैमन तिथं नव्हते. औसेपनं उठून मिस्त्रीला आदर-पूर्वक बसवून घेतलं. तशी विजयी मुद्रेनं मिस्त्रीनं विचारलं, "आता तरी कळलं की नाही ?"

"कळलं–तुम्ही लोक पक्के निष्ठुर आहात हे कळलं !"

"पण अजूनही काही कळायचंय्, औसेपभय्या अजूनही काही कळायचंय !"

"मिस्त्री, आता समजायचं काय बाकी आहे ? माझ्या मुलांची मारहाण करून अगदी अवस्था केलीत–आता काय अजून समजायचं आहे ?"

"त्यांना जिवे का मारलं नाही माहीत आहे ? मालकांनी हुकूम दिला असता तर तसंही झालं असतं. पण मालकांनी तसा हुकूम दिला नाही, याचं कारण माहीतंय ?"

"काय ?"

"कारण आपण ख्रिस्ती आहोत. सत्यावर विश्वास ठेवणारे आहोत. म्हणून त्यांना जिवे मारण्याचा हुकूम मालकांनी दिला नाही. समजलं ?"

"पण मग मारलं तरी का ?"

"मार–देवानं मार दिला ! देवाच्या विरुद्ध ते बोलले होते ना म्हणून ?"

हे ऐकताच सैमन बाहेर आला आणि त्यानं विचारलं, "देव ? हा मारपीट करणारा देव कुठला आहे ?"

"ऐकलंस औसेपभैय्या ?" मिस्त्रीनं चढ्या सुरात विचारलं, "हा देवाची निंदा करतोय्–पाहिलंस ?"

"देव मारील असं म्हणण्यातच देवाची निंदा आहे. म्हणून मिस्त्री तुम्हीच देवाची टिंगल करीत आहात !" सैमननंही जोरात बजावलं.

"तू गप रे–" औसेपनं मुलाला दटावलं.

आता मिस्त्रीनं भाव बदलला आणि प्रेमळ स्वरात तो म्हणाला.

"तुम्ही मुलं आहात म्हणून असं काहीतरी बोलता. मालक म्हणजे साक्षात् परमेश्वरच आहे. मालक जे बोलतात ते ईश्वराचं वचन असतं माहीत आहे ?"

"मिस्त्री, असं असेल तर मग मालकांचं सगळं बोलणं वेदग्रंथात लिहून ठेवा !"

"तुला गप्प बसायला सांगितलं ना ?" औसेपनं पुन्हा आपल्या मुलाला दम दिला.

"वर ते राहू दे—" मिस्त्रीनं हसत हसत सैमनला विचारलं, "तू कारखान्यात का येत नाहीस ?"

"का येत नाही हे मिस्त्रींना स्वतःला माहीत नाही ?"

"मला कसं माहीत असणार ?"

"वा ! काय बोलताय ? पोलिसांनी मारहाण करून अर्धमेलं केलं तरी म्हणे कारखान्यात कामाला का येत नाही."

"तू गप्प बस ना !" औसेपनं पुन्हा एकदा आपल्या मुलाला दटावलं.

"बाबा, पुन्हा मारायलाच ते आम्हाला परत बोलावत आहेत !"

"यायला अशाकरता सांगतोय की काम केलंत तर मजुरी मिळल. ज्याला पैसे मिळवायचेत त्यानं सरळ रस्त्यानं चाललं पाहिजे. पण ते सोडून जर कुणी देवाची निंदा करायला लागलं तर —"

"तर मारहाण सहन करायला लागेल हेच तुम्हाला म्हणायचंय ना मिस्त्री ?"

"मारहाणीबद्दल मी काही म्हटलंय का ? मालकांना जेव्हा समजलं की तुम्हाला उपास पडत आहेत तेव्हा दया येऊन त्यांनी मला इथं पाठवलं. तीन चार दिवसांनी बोट आली की माल पाठवायचाय."

"हं." सैमननं हुंकार दिला.

"मिस्त्री, तुम्ही आता जा. आम्ही जरा सल्ला मसलत करतो."

"सल्ला मसलत कसली करताय, आणि कुणाबरोबर ? ईषव जातीच्या लोकांशी सल्ला मसलत कराल आणि त्यांची संगत धराल तर त्यात तुमचं कल्याण नाही होणार. आधीच सांगतोय. ख्रिस्ती लोक श्रीमंत होत चाललेले ईषवांना पाहवत नाही."

"बरं. असू दे मिस्त्री. तुम्ही जा. आम्ही आता विचार करतो."

"उद्या येऊ मग ?"

"या."

मिस्त्री निघून गेला. तो गेल्यावर औसेप म्हणाला, "आम्ही ख्रिस्ती आहोत. म्हणून मालक आमच्यावर दया करतो हे त्याचं म्हणणं बरोबर आहे."

"तुम्हाला झालंय तरी काय ? खरं तर बोट आली की माल पाठवायचा आहे. म्हणून तर ख्रिस्ताचं नाव तो घेतोय !"

मग औसेप काहीच बोलला नाही.

  

त्यादिवशी मध्यरात्रीपर्यंत कुट्टप्पनच्या चहाच्या दुकानात उजेड होता. तो दुबळा माणूस, अंतोणि, रोक्कि, सैमन, मत्तायि आणि पद्मनाभन यांचे आवाज तिथून ऐकू येत होते.

तो दुबळा माणूस म्हणत होता, "मजुरांना कुठली जात नाही, धर्म नाही, ईश्वर नाही आणि देशही नाही. ईश्वर वगैरे सर्व काही भांडवलदारांकरता आहे. हा ईश्वर भांडवलदारांचा मिस्त्री आहे. त्याच्यावर आपण प्रहार केला पाहिजे."

"तो प्रहार वगैरे आपण नंतर पाहू—" अंतोणि गंभीर आवाजात म्हणाला, "उद्या कामावर जायचं का नाही हे आधी ठरवा."

मग दुबळा माणूस म्हणाला, "आपल्याला सर्वांना कामावर गेलंच पाहिजे. आम्ही ख्रिस्ती आहोत किंवा मालक दयाळू आहेत म्हणून आम्हाला काम दिलेलं नाही. आम्ही ईषव असलो तरीदेखील आम्हाला काम दिलं जाईलच. आपण काम करण्याची आपल्यासाठी जितकी आवश्यकता आहे तितकी मालकासाठीही आहे. म्हणून आपण कामावर गेलं पाहिजे."

शेवटी कामावर जाण्याचा निर्णय झाला.

  

मध्यरात्र झाली असेल नसेल तोच ॲना आणि एली घाबरून उठले. त्या-दिवशी सर्वांनाच उपाशी रहावं लागलं. पण त्यामुळं त्यांना काही त्रास झाला नव्हता. अंतोणि आणि रोक्कि परत येऊ देत एवढीच त्यांची प्रार्थना होती. अर्धवट झोपेत असलेला वक्कि पुन:पुन्हा विचारायचा, "आले का ते ?"

मग एलीनं आणि ॲनानं रस्त्यावर जाऊन पाहिलं. ॲनानं विचारलं, "आई, मध्यरात्र झाली तरी अजून कसे नाही आले ते ?"

"येतील. येतील."

"अजूनही पोलीस—"

"नाही. नाही. तसं काही नाही. ते नक्की येतील."

"काय आले का ते ?" वक्कीनं आतून विचारलं.

"आता येतील." एली उत्तरली.

औसेपच्या घरात अजून उजेड होता. त्यानं येऊन विचारलं, "आले का ?"

"नाही बाई !"

"मिस्त्री माझ्याकडे येऊन गेला हे तुम्हाला कळलं का ?"

"नाही. कशाला आला होता ?"

"कामावर या असं सांगायला."

"मग ?"

"मला असं वाटतं की सर्वांनी विचार करून काय ते ठरवलं पाहिजे."

"तसंच बरं."

"काय आले का ते ?" वक्कींनं पुन्हा घरातून विचारलं.

"आता येतील." एली उत्तरली.

"मिस्त्री म्हणत होता की आपण ख्रिस्ती आहोत. म्हणून आपल्याला जिवे मारत नाहीत–" औसेप सांगू लागला, "नाहीतरी मेल्यावर कोण विचारणार आहे ?"

आपली बहीण आणि आई दारात का उभ्या आहेत असे एकमेकांना विचारीत अंतोणि आणि रोक्कि तिथे येऊन पोहोचले. त्यांच्यामागोमाग मत्तायि आणि सैमन पण होते.

"अगं, आले की नाही ते ?" वक्कींनं परत हाक मारून विचारलं.

"हो. आले आले. मुलांनो. तुम्ही आधी आत जा पाहू."

अंतोणि आणि रोक्कि घरात शिरले. त्यांच्या पाठोपाठ एली आणि ॲना

## [८]

कुञ्ञु शंकरन साहेबाचा कॉयरचा कारखाना म्हणजे केवळ कारखाना नव्हता तर कितीतरी उद्योग व्यवसायांचं केंद्रही होतं. नारळ काढायचे. त्याच्या शेंड्या काढायच्या, शेंड्यांच्या दोऱ्या वळायच्या अशी अनेक कामं तिथं चालायची. कारखान्याजवळ चहाचं दुकान होतं आणि किराण्याचीही पण दुकानं होती. चटया विणण्याचं कामही आता तेथे सुरू झालं होतं.

पहिल्यांदा नारळाच्या शेंड्या काढून निवडून विकण्याचा व्यापार होता. पण मजुरांना दिली जाणारी मजुरी परत आपल्याला कशी मिळेल याचा विचार करण्यात आला. परिणामी चहाचं आणि किराण्याचं दुकान उघडण्यात आलं.

'यापुढं मजुरी तिखट, मीठ, तांदूळ, चहा, औषधं अशा स्वरूपातच दिली जाईल. ज्यांना हे मान्य असेल त्यांनीच कामावर यावं' असं मत मालकांनी जाहीर करून टाकलं. ही अट नाकारण्याची हिंमत मजुरांजवळ नव्हती. मजुरांना तसं वाटू नये म्हणून आधीच मालकानं मजुरांना विचारलं होतं, "तुम्हाला पैसे कशासाठी हवेत ? डाळ, तांदूळ घेण्यासाठी आणि चहा पिण्यासाठी ना. त्यासाठीच मी किराणा मालाचं आणि चहाचं दुकान उघडलंय. आधी तुम्ही डाळ, तांदूळ घ्या. आणि मग चहा प्या. मग तो हिशेब वगळता जर का पैसे उरले तर ते रोख घ्या."

पण व्हायचं काय की कुञ्ञु शंकरन साहेबाच्या किराणा दुकानातून डाळ, तांदूळ, खरीदल्यावर व मग चहा प्यायल्यावर कामगारांजवळ एक पैसा देखील शिल्लक राह्यचा नाही.

आता साहेबाला असं वाटायला लागलं की नुसता नारळाच्या शेंड्या विकण्यापेक्षा त्याच्या दोऱ्या वळून विकल्या तर अधिक फायदा होईल. शेंड्या काढणारे, निवड करणारे, दोऱ्या वळणारे असे लोक आले की कामगारांची संख्या वाढेल. आणि त्यांच्या डाळ, तांदूळाच्या खरेदीमुळं आणि चहा पिण्यामुळं दुकानाचा फायदाही वाढेल. मग ती कामं सुरू झाली. लगेच किराणामालाचं आणि चहाचं दोन्ही दुकानं मोठी करण्यात आली. इतकंच नव्हे तर सगळ्या वस्तूंच्या किंमती वाढविल्या. साहेब कामगारांना म्हणायचा, 'बघा, आलप्पुपाच्या बाजारात तांदुळाचा भाव एखाद्या डोंगराइतका वाढलाय. मिरचीच्या भावाचं तेच आहे. तुम्ही जर चहा पिणं सोडलंत तर बरं होईल. चहाची पावडर घ्यायची म्हटलं तर जमीन गहाण टाकावी लागेल.'

साहजिकच कुञ्ञु शंकरन साहेबाच्या दुकानातील सर्व वस्तूंचा भाव नेहमी जादा असायचा. त्याच्या तत्त्वानुसार पुढं भाव कमी होण्याचीही शक्यता नव्हती.

कालिकुट्टि ही कुञ्ञु शंकरन साहेबाच्या खजिनदाराची बायको. हा खजिनदार मुनिमाचेही काम करीत असे. नारळाच्या शेंड्या खरेदी केल्यापासून त्याच्या दोऱ्या वळेपर्यंतचा हिशेब आणि किराणा मालाचं व चहाचं दुकान ही दोन्ही दुकानं ती स्वतः सांभाळत असे. हिशेबाच्या वह्यात चुका करण्याची तिला सवय होती. पण ह्या चुका मजुरांच्या बाजूनं सहसा व्हायच्या नाहीत. नारळाच्या शेंड्या काढण्याऱ्या स्त्रीपुरुष कामगारांना कालिकुट्टि या विषयावर नेहमी काही ना काही तरी सांगत असे. पैशांऐवजी वस्तूच्या रूपात मजुरी घेतल्यामुळं कसा फायदा

होतो हे ती सविस्तर सांगायची. ती म्हणायची, 'मजुरीचे मिळालेले पैसे घेऊन बायकांनी बाजारात हिंडणं बरं नव्हे. हे माझ्या लक्षात आल्यावर मी साहेबांना तसं सांगितलं आणि ही दुकानं सुरू झाली. आता किती सोय झाली पहा—काम झालं की सामान घेऊन जो तो आपल्या घरी जाऊ शकतो.'

मजुरांच्या बायकांना ती सांगायची, 'त्यांनी पैसे मागितले तरी मालक द्यायचे नाहीत. माहीत आहे, का ? पैसे घेऊन ते जातात ताडी प्यायला. पुरूषांच्या हातात जो पैसा आहे तो घेण्यासाठी काही बायकाही बाजारात बसल्या आहेत. दारू पिऊन अशा बायकांबरोबर पुरूष हिंडायला लागले तर घरातल्या लोकांना उपाशी रहावं लागतं. म्हणून आम्ही त्यांच्या हातात पैसा देत नाही.'

अशाप्रकारे नारळाच्या शेंड्या काढून त्याच्या दोऱ्या वळायच्या आणि चहा व किराण्याचं दुकान चालवायच्या. अशा दोन्ही व्यवसायात कुञ्ञु शंकरन साहेबाला चांगलाच नफा होत राहिला. त्याचवेळी त्याच्या लक्षात आलं की विणलेली दोरी जर चटई विणण्याच्या कामी उपयोगात आणली तर अधिक फायदा होईल. मग त्यानं काही माग घेऊन चटई विणणंही सुरू केलं. किराणा माल आणि चहा दोन्ही दुकानात अर्थातच मग परिवर्तन केलं गेलं.

मग त्याला वाटायला लागलं की एक शिप्याचं आणि एक न्हाव्याचं दुकान उघडायला काय हरकत आहे ? आमच्या कारखान्यातले मजूर कापड घ्यायला किंवा कपडे शिवायला दुसरीकडं जानात हे बरं नाही. आपल्या मजुरांनी हजामतीसाठी आणि दाढीसाठी सलूनांच्या शोधात का वरं भटकावं ? साहेब म्हणायचा, 'आईबाप सोडून माझे कामगार जे जे मागतील ते ते मी देईन.'

पण बाहेरच्यापेक्षा दुप्पट चौपट भाव देऊन साहेबाच्या दुकानातून माल घेणं कामगारांना पटत नव्हतं. पण आपली नोकरी जाईल या भीतीनं ते सगळं मान्य करीत होते. पण अखेरीस त्यांचा विरोध कुरबुरीच्या स्वरूपात प्रकट व्हायला लागला. साहेबाच्या कानावर ही कुरबूर गेली. पण आपल्याला काही माहीत नसल्याचा त्यांनी बहाणा केला.

अखेर मजुरांच्या तक्रारींचा शेवट करण्यासाठी कालिकुट्टीशी विचारविनिमय करून साहेबानं एक उपाय शोधून काढला. उपाय असा होता की कालिकुट्टीची मोठी मुलगी सुमति हिला चहाच्या दुकानाची व दुसरी मुलगी नलिनी हिला शिप्याच्या दुकानाची व्यवस्थापक करायची. नवीन व्यवस्थापक नेमले

गेल्यावर कामगारांची कुरबूर कमी झाली.

सूचनेनुसार किंवा सूचनेशिवाय कुणास ठाऊक पण सुमति आणि नलिनीनं, दोघींनी कामगारांबरोबर गप्पा मारायला, हास्यविनोद करायला मागं पुढं पाहिलं नाही. परिणामी त्यांच्या प्रेमिकांत भांडणं होऊन मारामाऱ्याही झाल्या. अर्थात कुठल्याच घटनेला गंभीर स्वरुप आलं नाही.

एक दिवस बरेच लोक दुकानात चहा पीत होते. सुमति एका ग्लासात चहा घेऊन कुंचूला द्यायला गेली. कुंचूनं ग्लास घेण्याच्या मिषानं सुमतीचा हात धरला आणि ओढला. तशी चहाचा ग्लास खाली पडून फुटला. एवढं झाल्यावर सुमतीनं कुंचूची खरडपट्टी काढली, कुंचूही तिला रागानं काही बाही बोलला. या बाबतीत कामगारांच्यात फारच खळबळ उडाली. तेव्हा साहेबाला त्यात लक्ष घालणं भाग पडलं. तो म्हणाला,

'कुंचूनं जबरदस्तीनं त्या मुलीचा हात धरला म्हणून मोठा अनर्थ झाला नाही. पण कुणाच्या नकळत हात धरला असता तर बरं झालं असतं.'

शिप्याच्या दुकानातही प्रेमस्पर्धा होत होत्या. शिपी आणि कामगार यांच्यात त्या स्पर्धांमुळे भांडणं आणि मारामाऱ्या झाल्या. पण अखेर सगळ्यांना कळलं की कालिकुट्टि आणि साहेब यांचंच हे कारस्थान आहे.

अशा परिस्थितीत काही कॉयर कारखान्यातून कामगारांनी चळवळ सुरू केली. वरीदु साहेबाच्या कारखान्यात भांडणं होऊन अंतोणि, रोक्कि वगैरेंना पोलिसांनी पकडलं आणि त्याच भानगडीत वेलायुधन मारला गेला. हे सगळं जेव्हा कुञ्ञु शंकरन साहेबाला कळलं तेव्हा त्याने वरीदु साहेबाचं, छोट्या मालकाचं अभिनंदन केलं. ती संधी साधून छोटे मालक आणि मिस्त्री दोघांनी मिळून ख्रिस्ती आणि ईपव मजुरात फूट पाडणं सुरू केलं. कुट्टप्पनच्या चहाच्या दुकानाजवळच सण्णीचं[1] चहाचं दुकान होतं. वरीदु साहेबाच्या कारखान्यातले मिस्त्री, क्लार्क इत्यादि लोक सण्णीच्या दुकानात जाऊन चहा प्यायचे. सण्णीच्या दुकानात येणारे लोक कुट्टप्पनच्या दुकानात जाऊन चहा पिणं, पेपर वाचणं आणि जगाची उलाढाल करणं या गोष्टींचा तिरस्कार करायचे. सण्णि स्वतः कुट्टप्पनच्या दुकानाची चेष्टा करायचा. कधी कधी कुट्टप्पन त्याला उत्तरं देई.

---

१ सण्णी – एक ख्रिस्ती नाव.

वेलायुधनची अंत्ययात्रा झाल्यावर सण्णीच्या दुकानात ज्या चर्चा झाल्या त्याला जातीय रंग चढायला लागला. हळूहळू शब्दांना धार यायला लागली. एक दिवस सण्णीनं स्पष्टच सांगितलं, 'ईषवांच्या मनात मत्सर आहे. ख्रिस्ती लोकांनी पैसा मिळवायला सुरूवात केली तेव्हाच त्यांचा मत्सर सुरू झाला. म्हणून ख्रिश्चनांच्या कारखान्यातील मजुरांना भडकवून भांडणं सुरू केली.'

त्याचं हे बोलणं ऐकल्यावर सुपारी कापायचा चाकू काढून पानवाला वासु म्हणाला, "ईषवांच्या विरुद्ध जो खेळ खेळला जातो आहे. तो चांगला नाही. ईषवांनी कामं करायची आणि ख्रिश्चनांनी खिसे भरायचे असा जर बेत असेल तर तसं होऊ दिलं जाणार नाही."

वासूच्या बोलण्याचा प्रतिध्वनी कुट्टप्पनचं दुकान, किराण्याचं दुकान आणि औषधाचं दुकान इथपर्यंत उमटला. त्यानंतर सण्णीचं बोलणं अधिकच क्षोभजनक होऊ लागलं. त्याची उत्तरं लगेच दुसरीकडून मिळायला लागली. परिणामी असं तंग वातावरण तयार झालं की कोणत्याही क्षणी तिथं जातीय दंगल सुरू होईल !

कुञ्ञु शंकरन साहेबांनं हे सगळं ओळखलं आणि तो म्हणाला, 'ख्रिस्ती लोकांना पैसा मिळवायचा असेल तर ख्रिस्ती कामगारांकडूनच काम करून घेतलं पाहिजे. ईषव साहेबांनी ईषव मजूर घ्यावेत. हेच बरोबर होईल. मी तसंच करतो. माझे सर्व कामगार ईषव आहेत. पण ईषव लोक आपल्या जातीच्या लोकांबद्दल ममता बाळगीत नाहीत. मी पैसा मिळवितो आणि माझे जातवाले माझा मत्सर करतात. याचा अर्थ हाच होतो.'

वरीदु साहेबाच्या कारखान्यातील अधिकाऱ्यांनी आणि दुकानदार सण्णीनं असा प्रचार चालवला की ख्रिश्चन कामगारांनी आपल्या ख्रिश्चन मालकांबद्दल आत्मीयतेची भावना ठेवली पाहिजे. तिकडं कुञ्ञु शंकरन साहेब, कालिकुट्टि आणि वासु असं सांगत होते की 'ईषव कामगारांनी ईषव मालकांबद्दल आस्था बाळगावी.' इतकंच नव्हे तर त्यांनी असंही सांगितलं की 'ख्रिश्चनांकडे ईषव कामगार कामाला गेले तर त्यांनी जास्त मजुरी मागितली पाहिजे. कुञ्ञु शंकरन साहेबानं दोन तीन ईषव संमेलनात भाग घेतला होता, आपल्या घरासमोर भगवान विष्णूचे चित्र लावले होते. आणि ईषव समाजाच्या उद्धारासाठी दोन रूपये वर्गणी पण दिली होती. वरीदु साहेबाच्या बंगल्यावर पाद्री लोक रोज यायला लागले होते.

कुट्टप्पनच्या चहाच्या दुकानात बसून तो दुबळा माणूस म्हणाला, 'मजुरांना

देश, धर्म, जात काहीही नसतं' अंतोणीचे दबल्या आवाजातले शब्द लगेच घुमले, 'ख्रिस्ती भांडवलदार असो किंवा ईषव भांडवलदार असो दोघंही भांडवलदारच आहेत आणि ख्रिस्ती असो अथवा ईषव असो मजूर हा मजूरच आहे.'

त्याचे हे शब्द चहाच्या दुकानात, चौकात आणि मजुरांच्या घराघरात दुमदुमले.

म्हाताऱ्या औसेपनं एलीच्या घरी जाऊन एलीला म्हटलं, "मजुरांना जातीधर्म काही नसतो असं तुझे माझे मुलगे चहाच्या दुकानात सांगत होते. मालक ख्रिस्ती असो, ईषव असो वा नायर असो तो कामगारांना मजुरी देत नाही."

"बरोबर आहे." एली म्हणाली.

"पण जातीधर्म राहिलेच नाहीत तर ?"

"न राहिले तर काय होतं ?"

"आपण ख्रिस्ती आहोत ना ?"

"मालक पण ख्रिस्ती आहे. मालकाचा रखवालदारही ख्रिस्ती आहे ना? मग त्यानं वर्क्कीला आणि मला रस्त्यावर का ढकलून दिलं होतं ? ख्रिस्ती मालक दुसऱ्या मजल्यावरून हे पाहात होता ना ? पण तो काही बोलला नाही."

"ते आले का ?" वर्क्कीनं आतून विचारलं.

"आत्ता येतील !"

## [९]

आपली देणी देण्यासाठी कामगार दर आठवडाअखेर मजुरी घ्यायचे. पण त्यांची सगळी देणी कधीच फिटायची नाहीत. किंवा सगळी देणी फिटतील एवढी मजुरी त्यांना मिळायची नाही असं म्हटलं तरी चालेल. त्यांनी उधार घेतलेल्या मालाची किंमत अयोग्य रीतीनं वाढवून हिशेबाच्या वहीत लिहीली जायची. अर्थात् व्यापाराचं हेच तंत्र असतं. किराण्याचं दुकान आणि विडीचं दुकान या दोन्ही दुकानांचे सगळे मजूर कायमचे देणेकरी होते. देणी फिटावीत म्हणून काम करून मजुरी घ्यायचे.

शनिवार. त्या दिवशी शनिवार होता. मजुरी वाटपाचा दिवस. काम पूर्ण न केल्यामुळं अंतोणि आणि रोक्कि दोघांनाही त्यादिवशी मजुरी मिळाली नाही. मत्तायि आणि सैमनला थोडं फार तरी मिळणार होतं. हे चौघेही इतर कामगारांबरोबरच कारखान्याच्या अंगणात उभे होते. सर्वांच्या हातात टोपल्या होत्या. त्यादिवशी त्यांना दुकानातून उधार सामान मिळणार होतं. म्हणून ते टोपल्या घेऊन आले होते.

पण सर्वांच्या चेहऱ्यावर असा भाव होता की काहीतरी करायला ते सर्वजण उत्सुक आहेत ! काल रात्री उजाडेपर्यंत कुट्टप्पनच्या दुकानात चर्चा चालू होती. पद्मनाभन, अच्युतन, पप्पन, अंतोणि, रोक्कि मत्तायि, सैमन आणि तो दुबळा माणूस सर्वांनी चर्चेत भाग घेतला होता. त्या दिवशी कारखान्याच्या मागातून गंभीर कुरबुरी ऐकू आल्या.

कारखान्याच्या कार्यालयातही त्यावेळी सल्लामसलती चाललेल्या होत्या. दुपारी पोलीस इन्स्पेक्टर आले होते आणि छोटया मालकांशी खूप वेळ चर्चा करून गेले. मिस्त्रीनं तर रुद्रावतार घेतला होता. कारकून, कॅशियर इत्यादि सगळेजण अशी गंभीर मुद्रा करून उभे होते की जणू आता काही घडणारच आहे !

मजुरी वाटण्याची वेळ आली. मिस्त्रीनं व्हरांडयात येऊन हुकूम दिला, "ज्यांना मजुरी घ्यायचीय त्यांनी सर्वांनी या."

"मिस्त्री, आज एवढा गंभीरपणा का ?" सैमननं विचारलं.

"मग कसं ? तुमच्यासारख्या लोकांचा काय आदरसत्कार करायला पाहिजे का ?"

सैमन काहीतरी म्हणणार होता. पण मत्तायीनं त्याला अडवलं.

कॅशियरच्या जवळ बसलेल्या कारकुनानं एका एका कामगाराची नावं घेऊन हाक मारली. मिस्त्री मग तेच नाव पुन्हा ओरडायचा —

"वर्क्कि शौरि हजर आहेत ?"

"जी हाँ" म्हाताऱ्या शौरीचा मागून आवाज आला.

कडेवर टोपली घेऊन तो कॅशियरच्या टेबलापाशी पोहोचला. कॅशियरनं चांदीचा एक रुपाया आणि काही सुटे पैसे टेबलावर ठेवले. शौरीनं ते मोजले आणि त्याचा चेहरा काळवंडून गेला.

"हा कुठला हिशेब ?"

"हवं असेल तर घेऊन जा." मिस्त्री ओरडला.

"मला कुणाची दया नकोय." शौरीनं रुपये आणि पैसे टेबलावर ठेवून म्हटलं, "मला माझी मजुरी हवीय्."

"हीच तुझी मजुरी आहे." कॅशियर गंभीरपणे उत्तरला.

"मग हिशेब तुमचा चुकलाय."

"आता तू मला हिशेब शिकवायला आलास की काय ?"

"शिकवायला नाही. शिकायला आलोय. माझ्या हिशेबाप्रमाणे मला आणखी पाच रुपये मिळायला हवेत."

"सगळ्यांची मजुरी देऊन झाल्यावर तुला तुझा हिशेब सांगतो. तू बाजूला हो."

शौरि बाजूला झाला. कारकुनानं दुसरं नाव पुकारलं, "कंटन कुच्चय्यप्पन !"

"कंटन कुच्चय्यप्पन हजर आहे ?" मिस्त्रीनं ओरडत विचारलं.

"जी हाँ" हातातील टोपली जमीनीवर ठेवून एखाद्या प्रेतासारखा दिसणारा कुच्चय्यप्पन कॅशियरच्या टेबलाशी जाऊन उभा राहिला.

कुच्चय्यप्पन पण म्हातारा होता. शौरीपेक्षा अधिक म्हातारा आणि खेडवळ-पण. कारखान्याच्या सुरूवातीपासून तो तेथे काम करत होता. पण आता खूप म्हातारा झाला होता. शक्ती नाहिशी झाली तरीदेखील त्यानं काम सोडलं नाही. त्यानं काम केलं नाही तर त्याच्या कुटुंबाला उपाशी रहावं लागायचं. म्हातारी बायको, विधवा मुलगी आणि तीन मुलगे असे पाचजण त्याच्यावर अवलंबून होते. मृत्यूशीच झगडत तो काम करीत होता.

कॅशियरनं चांदीचा एक रुपाया आणि काही पैसे टेबलावर ठेवले. कुच्चय्यप्पननं ते मोजले. मोजता मोजता त्याचा हात थरथर कापायला लागला. शरीरही थरथरू लागलं. हातातले पैसे काही टेबलावर आणि काही जमीनीवर इकडे तिकडे पडले.

"आई भगवती !" असं म्हणत तो छाती पिटत ओरडू लागला.

"तुझ्या भगवतीला घेऊन इथून जा पाहू." मिस्त्री ओरडला आणि मग त्यानं आपली लोखंडी मूठ कोच्चय्यप्पनवर उगारली.

"त्याला हात लावशील तर खबरदार" पाठीमागून एक करड्या स्वरातला हुकूम आला.

मिस्त्रीनं आश्चर्यानं मागे पाहिलं.

"मिस्त्री, मी रोक्कि आहे." रोक्कि पुढं येत म्हणाला. तेवढयात अंतोणि रोक्कीच्या पुढं घुसला आणि त्यानं गंभीर स्वरात विचारलं, "कॅशियर, आम्ही काम करतो म्हणून तुम्ही मजुरी देता. मग हिशेब विचारल्यावर हे भुवया उंच करणं आणि अंगावर धावून येणं का ?"

"मी तेच विचारतोय." शौरीनं त्याची बाजू घेतली.

"प्रत्येकाचा मी हिशेब देत बसलो तर रात्र उजाडेल." कॅशियर विमनस्कपणे उत्तरला.

एवढयात आतून एक कारकून आला आणि कॅशियरच्या कानात काहीतरी गुणगुणला. तशी कॅशियरचा चेहरा बदलला आणि तो मर्यादेनं म्हणाला, "बरं ठीक आहे. शौरि पुढं ये. तुला हिशेब सांगतो." मग वही वाचून तो सांगू लागला, "या आठवडयाची मजुरी आहे चार रुपये बावीस पैसे."

"हं."

"त्यातून मिस्त्रीचा सव्वा रुपाया घेतला."

"तो कसा काय ?"

"रुपयाला चार आणे प्रमाणे –"

"पण आतापर्यंत रुपयाला बारा पैसेच घेत होता ना ?"

"आता चार आणे केलेत."

"हं. मसणात गेले —"

"मसणात गेले का म्हणालास ?" मिस्त्री ओरडला.

"मग काय म्हणू ?"

"आमच्या कष्टाचा पैसा जेव्हा मिस्त्री हिसकावून घेतो तेव्हा मसणात गेले याशिवाय काय म्हणणार ?" अंतोणि उद्गारला.

"तुला विचारलं होतं का मी ? पुन्हा जर मधे बोललास तर––"

"बोललास तर काय ?" रोक्कीनं एकदम पुढं येऊन विचारलं. अंतोणीनं आपल्या धाकटया भावाला मागं ढकललं. कॅशियर मग जरा बेतानं म्हणाला, "मिस्त्री, तुम्ही जरा गप्प बसा पाहू" आणि मग पुन्हा शौरीकडं वळून तो म्हणाला, "रुपयात चार आणे मिस्त्रीचे आहेत. ते कापूनच मजुरी दिली जाईल. हे मान्य नसेल तर मजुरी दिली जाणार नाही."

"एकदा सांगितलं ना की मसणात गेले. ते कापून सुद्धा साडेतीन रुपये

उरतातच की."

"त्यातून पुन्हा आठ आणे कापून घेतले."

"ते कसले ?"

मिस्त्रीनं एक पिवळ्या कागदाचा तुकडा शौरीच्या पुढं केला, "हे घे."

"हे काय आहे ?"

"हे नाटकाचं तिकीट आहे."

"कुठल्या नाटकाचं ?"

"चविट्टु नाटकाचं—पहा तर खरं एकदा."

"मी एकदा पाह्यलंय. मला पुन्हा पाह्यचं नाही."

"तुला पाह्यचं नसेल तर नको पाहू. पण हे तिकीट घे."

"मला तिकीट नको."

"सगळेजण जर घेत आहेत तर तू का नाही म्हणतोयस् ?"

"सगळ्यांनी घ्यायला पाहिजे असं कोण म्हणतो?" मागून मत्तायीनं विचारलं.

"तू गप रे." मिस्त्री ओरडला.

"काय तुला मान्य आहे ना ?" कॅशियरनं शौरीला गंभीरपणे विचारलं.

"ते आठ आणे मसणात गेले. आता तर तीन रुपये काही पैसे उरतील ?"

"त्यातून एक रुपया कापलाय्."

"तो कसला ?'

"वर्गणी."

"ही कसली वर्गणी ?"

"हेडक्लार्कच्या मुलीच्या लग्नासाठी !"

"अरे देवा देवा !" शौरि छाती पिटायला लागला.

"तू उगीच देवाच्या नावानं ओरडू नकोस. द्यायचे नसले तर नको देऊस. मी सांगीन की यानं नाही दिले."

"घ्या. ते सुद्धा घ्या. आतातरी जे उरेल ते द्या."

"पंचवीस टक्के मजुरी कमी केली आहे. ती कापून जी रक्कम उरली ती तुला दिली आहे."

"आई भगवती" थरथर कापत टेबलाला धरत कोच्चय्यप्पननं जमीनीवर बसकण मारली.

"मजुरी कमी करू देणार नाही." मागून सैमन ओरडला.

"कोण म्हणालं हे ?" मिस्त्रीनं विचारलं.

"काम करणारे म्हणाले."

"तर मग तुम्ही सर्वजण बाहेर जा. कारखान्यात टाळेबंदी होणार आहे."

"मग मजुरी देऊन टाळेबंदी करा." जानकी मागून ओरडली.

"कोण ग तू ?" मिस्त्रीच्या चेहऱ्यावर स्मितरेषा उमटली.

जानकी उर्फ जानू पुढं जाऊन उभी राहिली. आणि त्याला म्हणाली, "जानूला तुम्ही नाही ओळखत ? जरा इकडं पहा —"

"तू—तू होय ?" असं म्हणत मिस्त्रीचा हात जानूच्या मानेकडं गेला. तोच रोक्कीनं मिस्त्रीच्या छातीवर एक थप्पड लगावली. जानूनंही मिस्त्रीच्या डोक्यावर एक हाणली.

ऑफीसमधून चार-पाच तरणेबांड जवान बाहेर पडले. तशी चहावाला सणि दारातून ओरडला, "तुम्ही सर्वजण आत घुसा !"

लगेच बाहेरचे काही लोक मजुरांच्या त्या समुदायात घुसले आणि त्यांनी मारपीट करायला सुरूवात केली. लाथापण. मग आरडाओरडा, रडारडी सुरू झाली.

"हाणा-हाणा." रोक्कि जोरानं ओरडला. मत्तायि, सैमन, जानू, रोक्कि, शौरि, कोच्चय्यप्पन सर्वांनी मारामारी सुरू केली. ते मार देत होते आणि खातही होते. एकटा अंतोणि स्वस्थ उभा होता मार खात. ऑफिसमधून देखील आरडाओरडा आणि रडारड ऐकू येऊ लागली. टेबलं उलटी पाटली झाली, खुर्च्या मोडल्या.

"मारा, मारा. चांगले पिटून काढा." रोक्कीचे शब्द वातावरणात घुमले. तेवढ्यात कुणीतरी ओरडलं, "पोलीस आले !"

अंतोणि हसला.

  

अर्धी रात्र उलटली होती. वक्कींच्या घरात एली आणि ॲना ओसरीवर झोपल्या होत्या. तेल नसलेला रॉकेलचा दिवा मध्ये ठेवलेला होता. एखाद्या प्रेतासारखा.

"ते आले का ?"

उत्तर नाही.

'घु घू—घु घू—घु घू—' लांब असलेल्या झाडावरून एका घुबडाचा आवाज ऐकू येत होता.

"काय आले का ते ?" कसातरी चालत वर्क्कि ओसरीवर आला. मग अंगणात उतरून तो प्रश्न विचारीत लंगडत चालू लागला.

"ते आले का ?" दुरून कुठून तरी तो प्रश्न ऐकू आला —

एली खडबडून जागी झाली. तिनं वेड्यासारखं विचारलं, "कुठं गेले ते ?"

ती धावत अंगणात गेली.

"कुठं गेले ?"

ती धावत सुटली.

"ते आले का ?"

"ते कुठं गेले ?"

घ घू —घु घू —घु घू ——घुबड ओरडतच होतं.

## [१०]

"जाऊ नका, तुम्ही, जाऊ नका" एलीनं रडत रडत वर्क्कीला थांबवलं.

"तू बाजूला हो. मला माझ्या मुलांना भेटायचंय्."

"नका जाऊ ना—" एलीनं वर्क्कीला घट्ट धरून त्याची विनवणी केली, "ते येतील घरी. तुम्ही जाऊ नका."

वर्क्कि थकून खाली रस्त्यातच बसला. मग आकाशाकडं पाहून तो म्हणाला, "माझी मुलं परत येतील ना ?"

"येतील. येतील !"

"ते येईपर्यंत मी इथंच पडून रहाणार—" तो तिथल्या मातीत आडवा झाला. एलीनं त्याचं मस्तक आपल्या मांडीवर ठेवलं.

"देवा देवा—हे येशू" कसातरी तो म्हणाला. त्याचं तोंड उघडं पडलं आणि डोळे मिटले.

"आई ग—" एली एकदम किंचाळली. आणि बेशुद्ध झाली. 'बाबा बाबा' करीत ॲना धावत आली आणि खूप मोठमोठ्याने रडू लागली. तशी शेजारी पाजारी जागे झाले. सकाळी वर्क्कीच्या निष्प्राण शरीराबरोबरच एलीचं बेहोष शरीर ओसरीवर ठेवण्यात आलं. ॲनानं आपल्या वडिलांच्या पायावर हात ठेवले होते. ती रडत नव्हती. एली मध्येच सारखी उठायची. आणि आश्चर्यानं विचारायची, "ते गेले ? ते गेले ?"

आपले आईवडील, भावंडं आणि गाववाले यांना सोडून अर्ध्या रात्री ती त्याच्याबरोबर घराबाहेर पडली होती. दुःखांच्या आणि संकटांच्या मार्गावर त्याचा हात धरून ती खूप चालली. संकटांमुळे दोन आत्मे एक झाले. त्यांनी घेतलेले कडवट अनुभव गोड झाले.

"काय गेले ते ? गेले ?" शून्यात पहात ती विचारत होती.

कुणीच काही बोलत नव्हतं. ॲना तशीच बसून राहिली होती. हनुवटीवर हात ठेवून. जीवनाची एक लाट उंच जाऊन ओसरली होती. आता दुसरी लाट येणार होती.

  

अंतोणि, रोक्कि, सैमन, मत्तायि आणि दोन म्हातारे कोच्चय्यप्पन आणि शौरि सगळ्यांना पोलीस कस्टडीत डांबून ठेवण्यात आलं. चौकीच्या आसपास रहाणारे सांगत होते की 'सकाळपर्यंत चौकीतून रडारड आणि आरडाओरड्याचा आवाज ऐकू येत होता.

सकाळ झाली तेव्हा आलप्पुषा शहराच्या चारही बाजूंनी एक वादळ आलं— शहराच्या दिशेनं.

"भैय्या गेला तर आम्ही पण जाऊ," गर्दीतल्या एका माणसानं जोरात म्हटलं.

"झिजून झिजून मरण्यापेक्षा एकदम मेलेलं बरं' दुसरा मजूर म्हणाला.

"आम्ही जर एक झालो तर आम्हाला कोण मारणार आहे ?" तिसऱ्यानं विचारलं.

"आम्ही एकसाथ जाणार एकसाथ—" एकजण मोठयाने ओरडला.

"एकसाथ—हम सब एकसाथ" सर्वजण उंच आवाजात म्हणाले.

याप्रमाणं सर्व रस्त्यांवरून कामगारांची गर्दी झाली. त्यांचे उष्ण उच्छ्वास उंच गेले. हजारो कंठातून निघालेल्या प्रतिज्ञा मेघगर्जनेसारख्या आभाळात घुमल्या.

तो दुबळा माणूस, त्या प्रवाहातून विजेसारखा धावत होता. वरीदुसाहेबाच्या कारखान्याच्या दारात उभ्या असलेल्या मिस्त्रीनं त्यांच्याकडं अंगुलिनिर्देश करून छोटया मालकाला सांगितलं, "गडबड करणारा तो हाच."

कारखान्याची दारं उघडी होती. पण कामगार आत शिरले नाहीत. माग चालले नाहीत. कोपऱ्याकोपऱ्यावर, दुकानांच्यापुढं, झाडाखाली, बंदरावर आणि बसस्टँडवर मजूरच मजूर उभे होते.

'वर्क्कि मरून गेला!' ही वातावरणातली कुजबूज अगदी लवकर सर्वत्र पसरली आणि तिचं रूप बदलून लोक म्हणू लागले, 'वर्क्की मारला गेला.'

"वर्क्कि कोण ?"

"वर्क्कि ? अंतोणि आणि रोक्कीचे वडील."

अंतोणि आणि रोक्कि सर्वांना माहीत होते. त्यांच्या वडलांना मारलं ? कुणी ?

"अंतोणीच्या वडलांना कुणी मारलं ?" सर्वांनी हाच प्रश्न विचारला. पण उत्तर कुणीच दिलं नाही.

"सर्वजण अंतोणीच्या घराकडे चला." कुणीतरी म्हटलं आणि ती आज्ञा सगळीकडे पसरली.

'आम्ही जर स्वस्थ बसलो तर आमच्यातले सगळे असे मारले जातील.'

"पण गप्प रहाण्याशिवाय काय करणार ?"

"काय करणार ? तिथं पोहचू या आधी —"

"पोचल्यावर ?"

"पोचल्यावर सांगेन."

"अंतोणीच्या घराभोवती माणसांचा समुद्र उसळला होता. अनेक बाजूंनी माणसांचे आणखी प्रवाह येऊन मिळत होते.

"अंतोणि आणि रोक्कीच्या बापाला मारलं." सगळे कुजबुजत होते.

"कुणी मारलं ?"

"कुणी ? उंदीर कोण मारतं ? कोंबडी कोण पकडतं ?"

ॲनानं उठून चहूकडं पाहिलं. इतकी माणसं तिनं यापूर्वी कधी पाहिली नव्हती. ती सगळी माणसं संपप्त दिसत होती. ॲनाला क्षणभर वाटलं, आपल्या पित्याच्या मृत शरीरातून ही हजारो पिशाच्चे जन्मली आहेत !

ती अंगणात उतरली. लोकांमधून जाऊ लागली: एक कामगार म्हणाला, "ही अंतोणि आणि रोक्कीची बहीण."

"मुली तू कुठं चाललीस ?" तिच्या मस्तकावरून हात फिरवीत एकानं विचारलं.

"मी मोठ्या आणि छोट्या भावांना बोलवायला चालल्येय."

ऐकणारे सहानुभूतीपूर्वक हसले. एकानं विचारलं, "मुली तू गेलीस म्हणून ते येतील असं तुला वाटतं ?"

"येतील. येतील —मी बोलवायला गेल्यावर नक्की येतील !"

"पोलीस त्यांना सोडणार नाहीत."

"सोडतील ! मी पोलिसांना सांगीन की हे माझे दोन भाऊ आहेत आणि तिकडं माझे वडील मरून पडले आहेत !"

ऐकणारे थोडंसं हसले.

ॲना पुढं गेली.

तेवढ्यात लांबून आवाज आला, "ते आले —ते आले."

"ते आले ? माझे मुलगे आले ?" एली एकदम उठली, अंगणात उतरून धावू लागली.

"ते आले ?"

सर्वांनी एलीला वाट दिली. एलीला धरून रोक्कि आणि अंतोणि आले. त्यांच्यामागं तो दुबळा माणूस होता. ते घरात शिरले तेव्हा तो नाहीसा झाला.

ॲना आणि एली मृत शरीराला मिठ्या मारून रडत होत्या. रोक्कीनं डोळे पुसले. अंतोणि मात्र टक लावून पहात होता.

"पोलिसांनी त्यांना सोडलं ?" एकानं विचारलं.

"पोलीस तिकडं उभे आहेत. दर्शनानंतर त्यांना परत पकडून नेणार आहेत."

पाद्री आले. क्रियाकर्म झालं. शव तिरडीवर ठेवलं गेलं.

"काय, मला सोडून चाललात ?" एलीनं पुन्हा करूण स्वरात विचारलं. आणि ती बेहोष झाली.

ॲनानं एलीला सावरलं.

स्मशानाच्या दिशेनं ती यात्रा एखाद्या राजासारखी चालली होती. प्रेता-मागून दुःखानं ग्रासलेली, आपली असमर्थता ज्ञात असलेली माणसांची महानदी वहात होती.

चौकात एकानं यात्रेतल्या कामगाराला विचारलं, "कोण गेलं ?"

"अंतोणीचे वडील."

"अंतोणि कोण ?"

"अंतोणि माहीत नाही ?" त्या कामगाराला आश्चर्य वाटलं.

"कारखान्याचा मालक आहे ?"

"मालकच काय, मालकाचा बाप मेला तरी आम्ही असे जाणार नाही."

"पण मग तो आहे कोण ?"

"तो–तो आमचा नेता आहे, त्याचे वडील गेले."

स्मशानाकडं चाललेली ती यात्रा वरीदुसाहेबाच्या बंगल्यावरून चालली. व्हरांड्यात उभ्या असलेल्या वरीदुसाहेबानं त्या यात्रेकडं एकदा पाहिलं आणि लगेच तो आत नाहीसा झाला. छोटा मालक मात्र तिथंच उभा होता. तो अंगणात उभा राहून दात विचकत मिस्त्रीला काहीतरी सांगत होता.

यात्रेच्या शेवटी तो दुबळा माणूस एकटाच चालला होता. त्याच्याकडं बोट दाखवून मिस्त्री छोट्या मालकाला म्हणाला, "तो पहा गोंधळ करणारा."

# [११]

तो दुबळा माणूस कोण आहे ?

एक भावुक मजूर म्हणाला की तो गरम हवा आहे तर दुसरे म्हणाले की तो एक अंगार आहे !

हवेप्रमाणंच लपून छपून गल्लीतून जायचा. कामगारांच्या घरात शिरायचा, चहाच्या आणि पानाच्या दुकानांत थांबायचा. पण त्या हवेत झोप आणणारा गारवा नव्हता.

त्या हवेत उष्णता होती. झोपणाऱ्यांना जागं करणारी, पेटत्या आगीला भडकवणारी, पडलेल्यांना उठवणारी आणि शांततेत संघर्ष निर्माण करणारी उष्णता, कधी कधी ती ठिणगीसारखी उडायची देखील.

तो दुबळा माणूस कोण आहे ?

त्याचं नाव, त्याचं घर, त्याचं गाव–कुणालाच काही माहीत नव्हतं. जर त्याबद्दल कुणी त्याला विचारलं तर काहीतरी कारण सांगून तो ते टाळायचा. अखेर सर्वजण त्याला 'हवा' म्हणायला लागले. त्याच्यासाठी तेच नाव योग्य होतं ! हवा ! गरम हवा ! वादळाची वृष्टि करणारी वायुलहर !

कुञ्ञु शंकरन साहेबाच्या कारखान्यातही ती हवा कधीकधी लपत छपत घुसायची. एक दिवस कालिकुट्टीनं कुंचूला विचारलं,

"कुंचु इथं येतो तो कोण ?"

"इथं कोण येतं ?"

"एक वेडा इथं येतो तो कोण ?"

"तो होय ? तो येतो आपला —"

"पण तो आल्यावर तुम्ही कामगार त्याच्याशी चोरून का बोलता ?"

"जरा त्याची बडबड ऐकायला आम्ही त्याच्याजवळ जातो."

"त्याची बडबड ऐकायची असेल तर रस्त्यावर जावं, कामाच्या जागी उभं राहून काय ऐकायचंय ?"

"मग तो आल्यावर आम्ही काय करायचं ?"

"तुम्ही ऐकता म्हणून तो बडबडतो."

"पण तो बोलायला लागल्यावर ऐकू येणारच."

"मग तुम्ही त्याला चहा का पाजता ?"

"तो गरीब आहे म्हणून !"

"मग त्याला सांगा की यापुढं इथं येऊ नकोस म्हणून ?"

"पण तो आला म्हणून काय बिघडतं?"

"आला तर काय होतं हे पुढं सांगेन."

—त्यादिवशीही तो आला. गरम हवा. कामगार त्याच्याभोवती जमले. स्त्रिया आणि पुरुष. प्रत्येक कामगाराला त्याला काहीतरी सांगायचं होतं. त्याला तर सर्वांनाच काही ना काही सांगायचं होतं. कामगारांनी जे जे सांगितलं ते ते त्यानं लक्षपूर्वक ऐकलं. त्यानं जे जे सांगितलं ते ते कामगारांनी आदरपूर्वक ऐकलं. तो गेला तेव्हा कालिकुट्टीनं माधवीला बोलावून विचारलं,

"तो कोण आहे ग माधवी ?"

"तो आहे हवा."

"हवा ? मी माणसाच्या बाबतीत विचारत होते."

"पण सर्व लोक त्याला हवाच म्हणतात."

"तो काय तो ?"

"असाच आपला सहज !"

"तुम्ही त्याच्यावर एवढं प्रेम का करताय ? त्याला पाहिल्यावर एकदम उभे का राहता ?"

"त्यानं काय होतं ?"

"मान देणं, प्रेम करणं हे सगळं आपआपल्या घरी करत जा. इथं असलं काही नको."

"'तो काही वाईट माईट कामं करण्यासाठी हिंडत नाही."

"मग तो असा हिंडतो का ?"

"ते ? ते नाही मला माहीत." असं म्हणून ती तिथून लगेच निघून गेली.

दुसऱ्या दिवशीही तो माणूस आला. कामगारांबरोबर त्यानं बातचीत केली. आणि कामगारांनी त्याच्याशी कुज्जु शंकरन साहेबाचं माथं रागानं भडकून गेलं. त्यानं गोपालनला बोलावून विचारलं, "त्या भटक्याला इथं कोण बोलावतं ?"

"तो स्वत:च येतो मालक."

"त्याची जात कोणती ?"

"काय म्हणालात ?"

"तो ईषव आहे का हे मी विचारतोय ?"

"ते नाही मला माहीत."

"तो ईषवांना बरबाद करणार आहे."

"असं का म्हणताय मालक ? त्यानं कोणत्या ईषवाला बरबाद केलंय ?"

"मला —मला बरबाद करण्यासाठी तो असा भटकत असतो."

"त्याच्या हिंडण्या फिरण्यानं का मालक आपण बरबाद होतो ?"

"त्याच्या हिंडण्या फिरण्यामुळंच वरीदु साहेबाच्या कारखान्यात गडबड झाली ना ?"

"वरीदु साहेब काय ईषव आहेत ?"

"मला असं म्हणायचंय–"

"काय ?"

"मी ईषव नाही का ?"

"हो."

"मग ईषव मालकाचं हित कुणी करायचं ?"

"कुणी ?"

"ईषव कामगारांनी."

"तर मग ईषव कामगारांचं हित कुणी करायचं ?"

"अरे, तुम्हा लोकांच्या भल्यासाठीच तर मी हे सगळं करतोय !"

"अशा प्रकारची भलाई नको."

"हूं. ईषव लोक म्हणजे एक प्रकारचे कोंबडेच आहेत."

"ईषव लोक कसे कोंबडे होतील मालक ?"

"मारायला पकडले किंवा पाळायला पकडले तरी कोंबडे केकाटतच रहातात. म्हणून मी म्हणतो की ईषव लोक म्हणजे कोंबडे आहेत !"

"आमचं म्हणणं असं आहे की अशा तऱ्हेनं आम्हाला पाळण्याची काही एक जरूरी नाही."

"तर मग त्या मवाल्याचं ऐका आणि मरा !"

"यापेक्षा मरणं केव्हाही चांगलं !" गोपालन् उद्गारला आणि उत्तराची वाट न पाहता निघून गेला.

कुंचूनं गोपालला विचारलं, "गोपाल, मालक काय बोंबलत होता ?"

"मालक म्हणत होता की आपण सर्व कोंबडे आहोत. मारण्यासाठी पकडा किंवा पाळण्यासाठी पकडा ते केकाटतच राहणार"

"पण कोंबडे पकडतात कशाला ? पकडल्यामुळं ते केकाटतात."

"ते म्हणतात आम्ही पाळायला पकडतो—"

"पण पाळतात मारण्यासाठी, बरोबर आहे ना ?"

"मालकाचं म्हणणं असं आहे की आम्हाला पकडल्यावर आम्ही ओरडता कामा नये."

"जर कोंबड्यांना ओरडायला मनाई असेल तर कोल्ह्यानं त्यांना पकडणंही सोडून दिलं पाहिजे !"

"कुंचु भैय्या, ते तिथं उभे आहेत. त्यांना जाऊन हे सांग."

"गोपालन्, मी नंतर सांगीन."

'हवा' तरी सुद्धा येतच राहिला होता. त्याची शक्ती वाढत होती. कुजबूज आणि कुरकूर आता दात विचकण्यात आणि हुंकारात परिणत झाली होती. एक दिवस कुंचूनं कालिकुट्टीजवळ एक पैशाची विडी मागितली. कालिकुट्टीनं दोन विड्या दिल्या. कुंचूनं विचारलं, "हे काय ?"

"का तू विडी नाही मागितलीस ?"

"हो."

"ही विडीच आहे."

"मी एका पैशाच्या विड्या मागितल्या होत्या."

"या एक पैशाच्याच विड्या आहेत."

"काय एक पैशाला दोन विड्या ?"

"मग किती पाहिजेत ?"

"इतर दुकानात पैशाला चार मिळतात."

"जा. तिकडं जाऊन घे."

"मजुरीचे पैसे तुम्ही इकडे अडकवून ठेवल्यावर मी तिकडं जाऊन कशी खरेदी करणार ?"

"मग इथं मिळतील तेवढ्या घे."

"काय जकात घेता काय ?"

"काय तुझ्या बापानं मिळवलेत?"

"कुणाच्या बापानं काही मिळवलेलं नाही. आम्ही जे काम करतो त्याची मजरी द्या. बस !"

"मजुरी तर देतोच."

"पण पैशाच्या रूपानं द्या ना !"

"पैसे देणं शक्य नाही."

"कसं शक्य नाही ते मी पाहतो."

"पहा, पहा !"

कुंचूनं विडी घेतली नाही. त्यानंतर माधवीचं कालिकुट्टिबरोबर भांडण झाल. तिनं एक दिवस एक शेर तांदूळ घेतले आणि विचारलं, "तांदुळाचा भाव काय ?"

"भाव कशाल विचारतेस ? मुकाट्यानं पोळी खावी. तवा केवढा आहे विचारू नये !"

"आम्ही काम करतो. फुकट नाही खात !"

"काय बडबड लावलीय्. हवे असले तर घे —"

माधवी तांदूळ घेऊन गेली. जाताना ती बडबडत होती, "काम करायच्या जागी कापतात, सामान देताना कापतात, मग एकदम का नाही जीव घेत ?"

जरा वेळानं माधवी तांदूळ घेऊन परत आली. तांदुळाची टोपली कालिकुट्टीच्या समोर आपटून थरथरत ती म्हणाली, "घे. एकदा माझा जीव घे !"

"बोल, बोल. झालं काय ?"

"तांदुळाचं वजन बघ जरा –"

"काय जास्त झालं ?"

"मोजून बघ बये, जास्त आहेत का कमी ते !"

"तू सांग ना –"

"फक्त पाऊण शेर आहेत !"

"मग तू पावशेर कुणाला तरी दिले असशील."

"खबरदार. उगीच खोटं नाटं काही बोलू नकोस. आधी किमत जास्त त्यात वजन कमी. अशा तऱ्हेनं व्यापार करशील तर जळून जाशील !"

कालिकुट्टीनं माप घेतलं आणि माधवीच्या हनुवटीवर हाणलं आणि ओरडली, "चालती हो चांडाळणी !"

तशी माधवी दुकानात शिरली. तिनं वजनाचा काटा उचलला आणि कालिकुट्टीच्या डोक्यात हाणला. कालिकुट्टीचं डोकं फुटून रक्त वाहायला लागलं.

ती बातमी पोहचून कुञ्ञु शंकरन साहेब तिथं येईपर्यंत माधवी नाहिशी झाली होती.

# [१२]

ॲना सतरा वर्षाची झाली होती. एक छोटंसं कमळ फुलणार होतं. पण सुकलेली जमीन, तापलेले वारे आणि अंधारानं भरलेलं आकाश—मग ते कमळ कसं फुलणार ?

अभिलाषेची बरसात करण्याची ती वेळ होती. डोळ्यापुढं सोनेरी स्वप्न फुलवण्याची ती वेळ होती. पण ॲनाच्या कल्पनेतली अपेक्षा काटेरी झाडं झाली होती. तिच्या डोळ्यात अश्रू येऊ लागले होते.

तिचे वडील स्वर्गात गेले होते. दोन्ही भाऊ तुरुंगात गेले होते आणि आई स्वर्गात जाऊन आपल्या पतीची सेवा शुश्रूषा करायला उत्सुक होती.

एली घरातलं सारं काम करायची. अंगण ओसरी झाडायची, भांडी घासायची, चूल पेटवायची. पण सगळी कामं ती स्वप्नात असल्यासारखी करायची.

काम करता करता मधेच ती पेटी उघडायची. धतलेले कपडे आणि काळ्या किनारीची ओढणी घालून ती ॲनाला म्हणायची; "मुली, जरा मी बाहेर जाऊन येऊ का ?"

"आई, तू कुठं जातेस ?"

हा प्रश्न ऐकला की एली चिडायची. ॲनाचे वडील कुठं आहेत हे काय तिला माहीत नाही ? आणि वडिलांजवळ आईनं असणं आवश्यक आहे हे तिला समजत नाही ? तरी असं कसं विचारते ?

"तुला माहीत नाही मी कुठं जाते ते ? तिथं जाऊन मला त्यांच्यासाठी कांजी करायचीय् !" एली भराभरा चालायला लागायची. अॅना अडवायची.

"आई, तू त्यांच्याकडे कशी जाशील ? तुला वाट माहीत आहे ?"

"वाट ? जेव्हा मी तिथं पोहचेन तेव्हा ते माझी वाट पाहात असतील. काही न खाता पिता ते माझी वाट पाहात असतात." अॅनाला दूर ढकलून एली पुढं जायची.

"आई, नको ना जाऊ" अॅना एलीला मिठी मारून म्हणायची ; "आई, तुला तिथं जाता यायचं नाही. देवाच्या आज्ञेशिवाय तिथं कुणालाही जाता येत नाही."

"मला जाता येईल. वक्कींची बायको दारात उभी आहे असं देवाला सांगितलं की तो मला जाऊ देईल."

"नाही आई. तुला नाही जाऊ देणार."

"चल. बाजूला हो ग." एली ओरडायची.

अॅना आपली पकड सोडायची नाही. एली 'सोड सोड' असं ओरडत तिच्या पाठीत धपाटे मारायची. पण न रडता अॅना ते सहन करायची. मार मारून आई दमली की ती म्हणायची, "आई, मी तुझी एकटी मुलगी आहे ना ?"

मग एली शुद्धीवर यायची. आणि मुलीला छातीशी धरून रडत रडत म्हणायची, "लाडक्या पोरी, मी तुला कसं ग मारलं ?" आणि मग स्वतःची छाती पिटत ती म्हणायची, "मी माझ्या पोरीला मारलं. तिथं गेल्यावर ते मला विचारतील की तू माझ्या मुलीला का मारलंस ?"

अशावेळी शेजारी पाजारी धावत यायचे. तिचा हात धरून तिला थांबवायचे. कधीकधी ती अॅनाला मारायला लागली की शेजारी धावायचे आणि एलीला दूर करायचे. मग अॅनाचा चेहरा रागीट दिसायला लागायचा आणि ती ओरडायची, "माझ्या अंगाला कुणी हात लावू नका. आईला कितीही मारू द्या !"

तो दुबळा माणूस रोज यायचा. तो रोजच्या उदरनिर्वाहापुरते पैसे द्यायला यायचा. पहिल्यांदा त्यानं थोडे पैसे एलीच्या हातात दिले. तेव्हा एलीनं विचारलं, "काय, अंतोणीच्या बाबांनी हे पैसे पाठवले ?"

"हो."

"मग ते स्वतः का नाही घेऊन आले ?"

"आता त्यांना येता यायचं नाही."

"का, का नाही येता यायचं ?"

"ते त्यांना येऊ देत नाहीत."

"मग त्यांना कांजी कोण शिजवून देतं?"

'कांजी शिजवण्यासाठी तिथला माणूस आहे."

"पण ते प्यायचे नाहीत. माझ्याशिवाय कोणाच्या हातची कांजी ते प्यायचे नाहीत. मीच आता जाते त्यांना कांजी शिजवून द्यायला!"

तो दुबळा माणूस डोळे पुसत निघून गेला. दुसऱ्या दिवशी तो आला तेव्हा ॲना ओसरीवर उभी होती. तो जवळ येईपर्यंत ती त्याच्याकडं पाहात होती. अंगणात येऊन त्यानं एक कागदाची पुडी तिच्यापुढं केली. ती पुडी घेऊन तिनं दुसरीकडं पाहात विचारलं, "असं किती दिवस चालायचं?" तो तसाच उभा राहिला उत्तर न देता. ॲनानं त्याला विचारलं, "तुम्ही रोज असे पैसे आणता तरी कुठून?"

"कामगार वर्गणी करून सोय करतात."

"तर मग—" तिला काहीतरी बोलायचं होतं. पण ती काही बोलली नाही.

"मग मी जाऊ का?"

"जा. पण—" तिनं वाक्य पुरं नाही केलं.

"मी उद्या याच वेळेला येईन."

"माझे भाऊ कधी येतील?"

"येतील. येतील. लवकरच येतील." तो थांबला नाही. तो घाईघाईनं रस्त्यावर उतरून चालू लागला. जणू काही ॲनाच्या प्रश्नांना तो भीतच होता.

असेच काही दिवस गेले. एक दिवस तो पैसे घेऊन आला तेव्हा एली ओसरीवर उभी होती. त्याला पहाताक्षणी डोळे वटारून त्याच्याकडं पहात तिनं विचारलं,

"तुम्ही असे रोज का येता? मी विचारतेय् रोज का येता?"

तो गप्प राहिला. एलीचा आवाज मग आणखीनच चढला—

"ही पोरगी हा माझा उरलेला आधार आहे. तिला घेऊन जाण्यासाठी तू येतोस ना?"

त्यानं खाली मान घातली. स्वयंपाकघरातून ॲना धावत आली आणि दीनवाणीनं एलीला म्हणाली, "आई, तू कुणाशी बोलते आहेस, माहीत आहे ना तुला?"

"याच्याशी! तो तर आपल्याला मारायला निघाला आहे. तू पुढं आलास तर बघ रे आलास तर—"असं म्हणत ओसरीवरचा झाडू घेऊन एली अंगणात धावली—

ॲनानं तिला घट्ट धरून ठेवली. आणि रडत रडत ती आईला म्हणाली, "आई—आई— तू असं म्हणू नकोस. इथं जे उभे आहेत—जे उभे आहेत ते—"

"जा ग, इथून तू चालती हो." एलीनं ॲनाला ढकलून दिलं. लगेच तो दुबळा माणूस पुढं झाला, त्यानं ॲनाला सावरलं. तशी ती त्याला म्हणाली, "आईच्या बोलण्याकडं तुम्ही मुळीच लक्ष देऊ नका. ती हल्ली सारखी आजारी असते. त्यामुळं.......त्यामुळं....."

तो करुण असं हसला.

"तू, तू माझ्या पोरीचा जीव घ्यायला इथं येतोस ना ?"

त्याच्यावर झाडू उगारून एलीनं विचारलं.

"आई ग—" ॲनानं रडत ओरडत जाऊन तिच्या हातातली झाडू पकडला. तशी एलीनं झाडू टाकली आणि ती ॲनाच्या छातीवर नि पोटावर गुद्दे मारू लागली.

त्या दुबळया माणसाच्या डोळयात आता अंगार फुलला. पुढं होऊन त्यानं एलीचे दोन्ही हात धरले— एलीनं त्याला हिसडा दिला—पण त्यानं हात सोडले नाहीत.

"मेले ग बाई मेले—" एली खूप मोठयानं ओरडली.

"एक दोरी आण." त्या दुबळयानं ॲनाला फर्मावलं.

ॲनानं तोंड वाकडं केलं आणि रागानं विचारलं, "दोरी कशासाठी ?"

"हात बांधायला—"

"सोडा–सोडा...माझ्या आईचे हात सोडा— तिनं मला मारलं तरी चालेल, सोडा माझ्या आईचे हात सोडा."

त्या दुबळयानं एलीचे हात सोडले.

शेजारी धावत आले. त्यांना एलीनं ओरडून सांगितलं, "हा—हा...मला मारायला आलाय्— माझ्या मुलीला नेऊन तिला मारणार आहे."

कागदाची एक छोटी पुडी काढून ॲनाच्या पुढं टाकून तो निघून गेला. रस्त्यावर गेल्यावर त्यानं डोळे पुसले.

ॲनानं ती पुडी आपल्या डोळयांना लावली, त्यामुळं ती पुडी ओलीचिंब होऊन गेली.

[ १३ ]

ती उष्ण हवा आता सर्वत्र पसरली. त्या हवेतली उष्णताही वाढू लागली. त्या हवेचं हळूहळू एक 'लक्ष्य' ही बनलं.

'सर्व जगातील कामगारांनो एक व्हा' अशी घोषणा सर्वत्र दुमदुमू लागली. कामगारांच्या घराघरातून, कारखान्यांतून, चहाच्या दुकानातून आणि चौकाचौकातून ही घोषणा घुमली. ती घोषणा म्हणजे एक दिव्य मंत्र होता. आलप्पुषाचे कामगार केवळ आलप्पुषाचे किंवा तिरुवितांकुरचे किंवा भारताचे कामगार राहिले नाहीत. तर सर्व जगाचे कामगार झाले.

'तुमच्या हातातल्या बेड्याशिवाय तुम्ही काही गमावणार नाही आणि मिळवणार आहात मात्र अवघं जग !'

गुलामगिरीची बेडी नष्ट होते आहे. गरीबी, उपासमार, रोगराई आणि दडपण नाहीसं होत आहे. आणि मिळणार आहे सगळी दुनिया !

आलप्पुषाच्या प्रत्येक कामगारानं स्वतःच्या वैयक्तिक जगाची कल्पना केली. त्यांच्यापैकी क्वचितच कुणी जगाचा नकाशाचा पाहिला असेल आणि त्या नकाशातून भारत, तिरुवितांकुर आणि आलप्पुषा शोधून काढले असेल. एका लहानशा कागदावर काढलेल्या छोट्या नकाशांवरून जगाची कल्पना केली असेल.

पण भारत, तिरुवितांकुर. आणि आलप्पुषाच्या बाहेरही खूप जग पसरलेलं आहे. हे त्यांच्या आता लक्षात येऊ लागलं. त्या जगातही कामगार आहेत, ते एकाच जातीचे आहेत आणि त्यांना एक व्हायचं आहे. आपली गरीबी कायमची नाही. ती नाहिशी होणार आहे अन् तिला नाहिशी केली पाहिजे. आपण एक झालो तर सगळं जग आपल्या बाजूनं उभं राहील हेही त्यांना समजून आलं.

तो दुबळा माणूस आता सगळीकडं दिसू लागला.

त्या दिवशीही सकाळी गावातली शक्ती एखाद्या निर्झरासारखी कारखान्यांच्या दिशेनं वहात होती आणि तीच शक्ती संध्याकाळी कारखान्याच्या नळातून नि पाईपातून वाहणाऱ्या गरम आणि सांडपाण्याप्रमाणं परत गावाच्या दिशेनं वहात होती.

या प्रयत्नशक्तीनं कधी माणुसकी पाहिली नव्हती की भोगली नव्हती.

पण या प्रयत्नशक्तीवर स्वातंत्र्य सूर्याची किरणं पडू लागली. त्या माणसांच्या समुद्रावर नवे तरंग उठू लागले. जी माणसं आत्तापर्यंत मुकाट्यानं खाली मान घालून जात होती. त्यांची मस्तकं आता उंचावून रागानं थरथरू लागली. कधी कधी त्यांच्यात वादविवाद, पैजा आणि प्रतिज्ञा ह्याही गोष्टी ऐकू येऊ लागल्या.

'भांडवलशाही मुर्दाबाद'च्या घोषणा देताना त्यांची हृदयंच बाहेर यायची.

पद्मनाभन, अच्युतन, जोसेफ, शंकु हे सगळे या नवजागृतीचे प्रतिनिधी होते. काम संपल्यानंतर ते प्रचारकाची भूमिका वठवीत. चौकाचौकातून आणि चहाच्या दुकानातून ते भाषणं देत. वादविवाद करीत. स्वत: आवेशात असत. इतरांना आवेशात आणत.

अगदी पहिल्यांदा जो कामगार संघ तयार झाला, त्या संघाच्या कार्यालयात बसून एकदा पद्मनाभन म्हणाला, "आपण सर्वांनी एक होऊन नुसती गर्जना केली तरी——"

"गर्जना करून काय होणार ?"

"त्या गर्जनेनं हे जग थरथर कापायला लागेल. आता लौकरच तशी वेळ येणार आहे."

जोसेफ पुढं त्याला पुस्ती जोडत म्हणाला, "भांडवलदार थरथर कापायला लागतील, पोलीस घाबरतील, सगळे लोक थरथरायला लागतील—माहीत आहे ?"

"मग आपण ती गर्जना का करीत नाही ?" पप्पननं विचारलं.

"पहा तर खरी आमची गर्जना. आम्ही सर्वजण जी गर्जना करणार आहोत ती तुला दाखवीनच."

"ज्यांनी हुंकार काढला, गर्जना केली, ते तुरुंगांत खितपत पडलेत्" अच्युतन निराश चेहऱ्यानं उद्‌गारला.

"ते तुरुंगांत खितपत पडलेत म्हणूनच आपण एकी करीत आहोत ना ?"

"पण आपण एक कुठं झालोत ?"

"मग हा संघ, हे ऑफिस हे काय आहे ?"

इतका वेळ बाकावर गप्प बसलेला तो दुबळा माणूस एकदम दृढ शब्दात म्हणाला, "मजुरांनी, कामगारांनी एक झालं पाहिजे. एक होऊन गर्जना केली

पाहिजे. जगाचा थरकाप उडविणारी. आणि मग जगाचे शासक कामगारच होतील." एवढं बोलून तो एकदम उठला. आणि पुढं म्हणाला, "जगात असा एक देश आहे की जिथले मजूर एक झाले. त्यांनी एक प्रचंड गर्जना केली. त्या गर्जनेनं तिथले भांडवलदार आणि शासक इतके थरथर कापायला लागले की शेवटी ते खाली पडले आणि मरून गेले."

"हा कुठला देश ?" पद्मनाभननं विचारलं.

"रशिया."

"रशिया ? जोसेफनं प्रश्न केला. "रशिया कुठाय् ?"

त्या दुबळ्यामाणसानं मग रशियाची आणि रशियन राज्यक्रांतीची संपूर्ण माहिती त्यांना दिली. सर्वजण त्याचं सांगणं मनःपूर्वक ऐकत होते. शेवटी पद्मनाभननं विचारलं, "तर मग ?"

"तर मग काय ?" जोसेफनं विचारलं.

"आपण इथंसुद्धा ——"

"हो. आपण इथंसुद्धा क्रांती करू शकतो." दुबळा माणूस मध्येच सांगू लागला, "आपण क्रांती केली पाहिजे. भांडवलशाही आणि तिची साथीदार शासनसंस्था आणि त्यांनी चालवलेलं शोषण केवळ बंड करूनच नाहीसं करता येईल."

"बंड ! त्याचा अर्थ काय ?"

"रशियातील कामगारांनी संघटित होऊन हातात शस्त्र घेतले आणि अनेकांना ठार मारले. त्यात जसे विरोधक मारले गेले तसे पुष्कळसे कामगारही मारले गेले. रक्ताचे पाट वाहिले. याला बंड असं म्हणतात."

"मग ?"

"कामगारांनी शासन आपल्या हाती घेतलं."

"आणि इथं ?"

"इथंपण बंड झालं पाहिजे. इथंदेखील रक्ताचे पाट वाहिले पाहिजेत आणि शासन हाती घेतलं पाहिजे."

"मग आपणच पोलीस होणार ना ?" जोसेफनं विचारलं.

"केवळ पोलीस नाही. आपण सबकुछ होणार." तो दुबळा निश्चयी स्वरात उद्गारला.

सबकुछ कामगारांनीच व्हायचं. आजचा दरिद्री उद्या सत्ताधिकारी होणार.

सर्वांनी आपल्या माना उंच केल्या आणि छात्या फुगवल्या.

कुट्टप्पनच्या दुकानात मध्यरात्रीपर्यंत वादविवाद चालला होता. उष्ण हवा वेगानं पुढे चालली होती.

मध्यरात्रीनंतर मग सर्वजण गर्वोन्नत होऊन चहाच्या दुकानातून बाहेर पडले. कुट्टप्पन आणि तो दुबळा दोघं तिथंच झोपले.

त्यांना झोप लागली असेल नसेल तेवढ्यात बाहेरचा दरवाजा कुणीतरी वारंवार वाजवू लागलं. दोघंही जागे झाले. तेव्हा त्यांना दार वाजवल्याचा आणि त्याचबरोबर एका बाईचा आवाज ऐकू आला.

"कोण आहे ?" कुट्टप्पननं उठून विचारलं. दुबळा पण उठला.

दाराची एक फळी काढून कुट्टप्पननं उत्सुकतेनं विचारलं. "कोण आहे ?"

रस्त्यावरचे दिवे गेले होते. अंधारात नुसती सावली दिसत होती. मधून मधून सुस्कारे पण ऐकू येत होते. कुट्टप्पननं पुन्हा विचारलं, "कोण आहे ? सांगा. कोण आहे ?"

"इथं 'हवा' आहे का ?" सुस्काऱ्यातून एक प्रश्न आला.

"हो आहे. काय पाहिजे ?" तो दुबळा पुढं येऊन उभा राहिला.

"आई ......आई" असे शब्द आले आणि त्या पाठोपाठ ओक्साबोक्सी रडणं !

"कोण ॲना ? काय ग झालं आईला ?"

"आई नाहिशी झाली. ती इकडं आली का ? माझ्या आईला तुम्ही पाहिलंत का ?" ती आणखीनच रडायला लागली.

"केव्हापासून आई दिसेनाशी झाली ?"

"संध्याकाळी मी तुझ्या वडिलांना कांजी नेऊन देते असं सांगून ती निघाली. मी तिला थांबवली. पण तिनं मला खूप मारलं आणि कशीतरी मी तिला घरी आणली. कांजी पाजली. मग आम्ही दोघी झोपलो आणि आत्ता मी जागी होऊन पाहते तो—" तिच्या तोंडून शब्द उमटेना.

"चल माझ्या बरोबर." दुबळा माणूस बाहेर निघाला त्याच्या पाठोपाठ ॲना.

निर्जन आणि घनदाट अंधारातून ते चालले होते. रस्त्याच्या दोन्ही बाजू काळजीपूर्वक पहात. ॲनानं मध्येच विचारलं, "तुम्हाला वाट माहीत आहे ?"

"कुठली वाट ?"

"स्वर्गाची !"

त्यानं काही उत्तर दिलं नाही. अंधाराकडं पाहून तो एकदा मनाशी हसला.

"कसं जायचं ?" ॲनानं परत विचारलं.

त्यानं उत्तर दिलं नाही.

"पूर्वी तुम्ही तिथं गेला होता ?"

"नाही."

"तिथं गेल्यावर परत येता येत नाही ना ?"

"नाही."

"मग माझी आई—" ती एकदम रडायला लागली.

दुबळा वळून थांबला. त्यानं ॲनाच्या खांद्यावर हात ठेवला आणि तिला जवळ घेतली.

"रडू नकोस." तिचे डोळे पुसून तिची समजूत घालत तो म्हणाला, "अजून तुझी आई तिथपर्यंत पोहोचली नसेल."

नंतर तो काहीच बोलला नाही. आणि बोलणार तरी काय ? ॲनाला वाटत होतं. आई बाबांना कांजी करून द्यायला स्वर्गात गेलीय्. आणि तिथं गेल्यानंतर परत येता येत नाही. मग काय बोलणार ?

मग तिच्या मनात आणखी एक शंका आली. तिला वाटलं रस्त्यात कुठंतरी पडून ती वेडी जरी मरून गेली तरी कुणाला कळणार ?

ते चालत होते. पण आपण कुठं चाललो आहोत हे त्यांना माहीत नव्हतं.

सकाळ झाली. शहराच्या पूर्व टोकाला जिथं नाले मिळत होते तिथं ते थांबले. तलाव आणि नारळाच्या बागेपलीकडून वर येणाऱ्या सूर्याला तो दुबळा पहात होता. ॲना जवळच्याच एका नारळाच्या झाडाला टेकून उभी राहिली. आणि एकदम 'आई ग' असा उद्‌गार काढून ॲना बेहोष झाली.

त्यानं मग तिला नीट जमिनीवर झोपविलं. लगेच आसपासचे लोक धावले आणि एका खाटेवर तिला झोपवून घरी घेऊन गेले.

दुसऱ्या दिवशी शहरभर बातमी पसरली. की वेंवनाट्टु तलावात एक बाईचं प्रेत तरंगत आहे !

## [१४]

ॲना आता एकटी पडली. वडील देवाघरी गेले. आणि वडिलांना कांजी करून देण्यासाठी आई पण स्वर्गात निघून गेली. मोठा आणि छोटा दोघंही भाऊ तुरुंगात गेले. आता तिच्या जीवनाचं वैराण वाळवंट बनलं.

तो दुबळा माणूस रोज यायचा. कागदाची छोटी पुडी ॲनाच्या हातात द्यायचा. तिच्या रोजच्या उदरनिर्वाहाला ती पुरेशी असे.

तो तिला काहीही विचारायचा नाही. प्रश्न आणि उत्तरं दोघांनाही माहीत असायची. मग विचारायची काय जरूर ?

पुडी दिल्यानंतर ती दोघं जरा वेळ एकमेकांकडे पहायची. हसायची मग तो वळून चालायला लागायचा. ती त्याचं चालणं पहात राह्यची. कोपऱ्यावरच्या वळणापाशी तो पोहोचला की तो एकदा मागं वळून पहायचा. तेव्हासुद्धा ती त्याच्याचकडं पहात असलेली त्याला दिसायची.

एक दिवस पुडी दिल्यावर त्याला काहीतरी म्हणायचं होतं. पण शब्द बाहेर पडले नाहीत. एक दिवस पुडी घेतल्यावर ॲनाला काहीतरी बोलायचं होतं. तिच्याही तोंडून शब्द फुटला नाही.

त्यानंतर आणखी काही दिवसांची गोष्ट. पुडी घेतल्यावर ॲना व्याकुळ होऊन उभी होती. त्यानं विचारलं, "काय झालं ?"

आकाशाकडं पहात ती म्हणाली, "किती दिवस अशा तऱ्हेनं—"

का ? मी आणलेले पैसे घ्यायला अवघड वाटतं ?"

"घ्यायला काही अवघड वाटत नाही—"

"मग काय वाटतं ?"

"रोज अशा तऱ्हेनं पैसे आणायचे म्हणजे—"

तो जरा हसला. मग ॲनानं विचारलं, "किती दिवस असे पैसे आणणार ?"

"ते दोघं येईपर्यंत."

"ते येतील ?"

"येतील."

"पण तुम्हीच म्हणाला होता ना की स्वर्गातून परत येता येत नाही म्हणून ?"

"मी अंतोणि आणि रोक्कीच्या बाबतीत बोलतोय."

"ते कधी येतील ?"

"अगदी थोड्या दिवसांनी !"

"ते आल्यावर देखील तुम्ही याल इथं ?"

दोघं खाली मान घालून उभे होते. अॅनाला काहीतरी विचारायचं होतं पण तिनं विचारलं नाही.

तो हळूहळू चालायला लागला. कोपऱ्यावरच्या वळणावर वळताना त्यानं मागं पाहिलं. त्यावेळी देखील ती त्याच्याकडं पाहात होती.

औसेपनं अॅनाला सांगितलं होतं की रात्री तू आमच्या घरी झोपायला येत जा. पण अॅनानं ते ऐकलं नाही. जिथं आपली आई रहात होती, जिथं आपले वडील गेले ते घर सोडून दुसरीकडं रात्र काढणं तिला पटत नव्हतं. ती म्हणाली, "दादा, मी येणार नाही. मरेपर्यंत मी इथंच झोपणार."

एका संध्याकाळी वरीदु साहेबाच्या कारखान्यातला मिस्त्री अॅनाच्या घरी आला. त्यानं अॅनाला विचारलं, "काय कसं चाललंय ?"

ती काहीच बोलली नाही.

"तू कारखान्याकडं का येत नाहीस ?"

ती गप्प राहिली.

"तू बोलत का नाहीस ?"

"काय बोलू ?"

"मी विचरतोय की तू कारखान्यात येशील का ?"

"का ?"

"का म्हणजे, आलीस तर काम देईन."

"माझ्या भावांना विचारल्याशिवाय मी नाही यायची."

"ते केव्हा येणार आहेत ?"

"हूं"

"मग खर्चाचं काय करतेस ?"

"होतं आपलं कसंतरी."

"तर मग एक सांगतो ऐक."

"काय ?"

"तू कामावर आली नाहीस तरी चालेल. पण तुला पगार मिळेल."

"असं कसं म्हणता मिस्त्री ? कामाशिवाय पगार कुठला ?"

"ते ना, ते ना——असं आहे——" असं म्हणून मिस्त्री अशा तऱ्हेनं हसला की अॅनाला त्याची किळस आली आणि ती तिथून निघून गेली.

अॅनानं ही गोष्ट औसेपला सांगितली नाही. पण दुसऱ्या दिवशी जेव्हा तो दुबळा माणूस आला तेव्हा त्याला ती म्हणाली, "मिस्त्री आला होता कारखान्यातून–"

"कशासाठी ?" त्यानं भुवया उंचावून विचारलं.

"त्यानं मला कारखान्यात यायला सांगितलं. मी नाही म्हटलं. तर तो म्हणाला की तिथं यायची जरूर नाही. तरीसुद्धा तुला पगार मिळेल. तर मी विचारलं की काम न करताना पगार कसा मिळेल. तर तो हसायला लागला."

"हूं" तो रागानं उद्गारला.

त्यादिवशी संध्याकाळी सुद्धा परत मिस्त्री आला. त्यानं विचारलं, "रात्री तुझ्या सोबतीला कोण आहे ?"

"औसेपदादा."

जरा वेळ तो गप्प बसला. मग म्हणाला, "छोटया मालकांच्या सांगण्यानुसार मी आलो आहे."

ती काहीच बोलली नाही.

"छोटया मालकांनी सांगितलंय की रात्री ते इथं येणार आहेत."

"कशासाठी ?"

"तुला विचारायला त्यांनी मला सांगितलंय."

"ही सगळी जागा त्यांचीच आहे. मग मला विचारण्याची काय जरूर ?"

"विचारायची जरूर ........ जरूर अशाकरता आहे की——" तो एकदम हसायला लागला.

अॅना तिथून निघून गेली.

अंधार पडला. वृद्ध औसेप आला. ओसरीवरच चटई पसरून तो खोकत खोकत झोपला. पण अॅनाला झोप आली नाही.

आणि अचानक पावलांचा आवाज ऐकू आला. कुणीतरी अंगणातून आल्या-सारखं वाटलं. अॅनानं हाक मारली, "दादा."

औसेप उठला नाही. पण पावलांचा आवाज मात्र थांबला.

'आत्ता आले तर—' ॲनानं स्वतःलाच विचारलं. ती उठली. अंधारात चाचपडत तिनं कोयती शोधून काढली. आणि आपल्या उशाखाली ठेवून ती झोपली.

मग काही व्यक्तींचे पळण्याचे आवाज ऐकू आले. त्याच्या पाठोपाठ एक गर्जना आणि किंकाळी पण.

ॲना खडबडून उठली. एका हातात कोयती घेऊन तिनं दरवाजा उघडला. मग आणखी आरडाओरडा तिला ऐकू आला. "कोण आहे ?" ॲनानं जोरात विचारलं.

"अरे बापरे काय झालं ? काय झालं ?" औसेप पण उठून बसला.

ॲना अंगणात आली. औसेपपण आला. औसेपनं घाबरून विचारलं, "काय झालं काय ?"

गल्लीतून चार पाच माणसं अंगणात आली. तो दुबळा माणूस ॲनाजवळ आला आणि म्हणाला, "काही नाही. काही नाही."

"कोण ओरडत होतं ?"

"असंच कुणीतरी ओरडत होतं !"

"असंच कोण ओरडेल ?"

"सगळा खेळखंडोबा आहे खेळखंडोबा !" तो ॲनाच्या अगदी जवळ आला आणि त्यानं विचारलं, "हे काय कोयती ?"

"ती कोयती ...... ती कोयती" ती थांबली.

"आता काही होणार नाही. जाऊन झोप." तो निघून गेला. त्याच्या पाठोपाठ इतर लोकही.

"कोण ग ओरडत होतं ?" औसेपनं ॲनाला विचारलं.

"बहुतेक छोटे मालक."

मग थोडा वेळ चूप राहून तो म्हणाला, "जर छोटे मालक असतील तर—"

"तर ——"

"सापाला जखमी करून सोडून दिलं तर —"

"काय होतं ?"

"तो पुन्हा संधी मिळाल्यावर दंश केल्याशिवाय रहात नाही."

तर ही अशी जात आहे का, की जखमी केल्यावर किंवा त्रास दिल्यावर परत दंश करील अशी ?"

"हो ना. जखमी केलं तरी वैताग. ठार मानलं तरी वैताग !"

"मग काय करायचं ?"

"देवा — देवा" औसेपनं आकाशाकडं पाहिलं.

आणखी दोन दिवस गेले. ॲना सकाळीच स्वयंपाकाला लागली होती. तेवढ्यात कुणीतरी बाहेर हाक मारली. ती लगेच बाहेर गेली. अंगणात पाच सहा माणसं उभी होती. पद्मनाभन, अच्युतन, जोसेफ आणि शंकु हे तिच्या माहितीचे होते. ते दोन तीन वेळा अंतोणि आणि रोक्किबरोबर आले होते. उरलेल्या दोघांना ती ओळखत नव्हती.

सगळ्यात पुढं एक बुटका, निमगोरा इसम उभा होता. त्याचा चेहरा गोल होता. आणि डोळे लहान आकाराचे असूनही चमकदार होते. सर्वजण त्याच्याकडं आदरानं पहात होते. त्याचे कपडे मळके होते, पण त्याच्याजवळ महागडं घड्याळ आणि उंची पेन दिसत होतं. कातड्याची एक बॅग त्यानं बेफिकीरीनं हातात धरली होती.

ॲनाला पाहिल्यावर तो हसला. पद्मनाभननं नम्रपणानं त्याला म्हटलं, "ही अंतोणीची बहीण."

"मला ओळखतेस ?" एक गंभीर हास्य करून त्यानं ॲनाला विचारलं.

ॲना नुसती त्याच्याकडं पहात राहिली.

"हे आमचे——" पद्मनाभनला ओळख करून द्यायची होती तेवढ्यात त्या बुटक्यानं त्याला अडवलं आणि ॲनाला म्हटलं, "अंतोणि, रोक्कि—सगळे परवाच्या दिवशी येतील. मी हे सांगायलाच आलो आहे."

"येणार—कधी येणार ?" ॲनाचं हृदय आनंदानं प्रफुल्लित झालं.

"परवा येतील. तुरुंगातून सुटणाऱ्यांचं शाही स्वागत करायचं ठरवलं आहे. ॲनानंही तेव्हा आलं पाहिजे."

"कुठं यायचं ?"

" ते सांगूच—पण तू ठीक आहेस ना ?"

"हो. मी आता ठीक आहे."

"बरं. मी जाऊ ?"

"हं."

—तो मागं वळून चालायला लागला. इतर लोकही त्याच्या मागोमाग जाऊ लागले. औसेप तेवढा थांबला. त्यानं ॲनाला विचारलं, "ते कोण आहेत माहीत आहे ?"

"कोण ?"

"आमचे पुढारी — पुढारी म्हणजे परमेश्वराइतकाच मोठा माणूस. ते खूप शिकलेले आहेत आणि पैसेवाले पण. गरीबांचा उद्धार करण्यासाठी ते इथं आले आहेत." एका दमात औसेपनं सगळं सांगून टाकलं.

"पुन्हा जर ते आले. तर त्यांचं देवासारखं स्वागत कर."—एवढं शेवटी सांगून औसेप निघून गेला.

आपले भाऊ येणार या जाणीवेनं ॲनाचं हृदय भरून आलं होतं.

## [१९]

साथी नीलकंठन हे त्याचं नाव. तो उच्च कुळातला आहे. शिकलेला आहे आणि अधिकारीपण आहे.

राजनीती, अर्थशास्त्र आणि सांस्कृतिक विषयात जेवढा तो तज्ज्ञ आहे तेवढाच तत्त्वज्ञानाचा आणि इतिहासाचा पंडित आहे. आदर्श प्रेम, स्वातंत्र्य प्रियता आणि उच्च आकांक्षेमुळं तो या चळवळीत फेकला गेला. आपलं सुखी समृद्ध जीवन आणि सरकारी नोकरीची शक्यता असूनही ते सर्व सोडून जनतेचं नेतृत्व करण्यासाठी तो इकडं आला. केवळ राजनैतिक गुलामगिरीचाच नव्हे तर आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक गुलामीचाही शेवट करण्याची त्यानं प्रतिज्ञा केली होती.

प्रभूंच्या घराण्यात त्याचा जन्म झाला होता. आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक क्षेत्रात त्याचा प्रभाव होता. परकीय शासनामुळं येणाऱ्या अडचणी त्यांना सहन कराव्या लागल्या. तरीदेखील तो तरुण, गुलामांचा उद्धार करण्यासाठी,

क्लेश सहन करणाऱ्या लोकांची कामं करण्यासाठी आणि त्यांचे अश्रू पुसण्यासाठी एखाद्या देवदूताप्रमाणं जनतेत उतरला होता. आणि म्हणून त्याला फार आदरानं वागविलं जात होतं.

निमगोरा, बुटका, गोल चेहऱ्याचा तो माणूस होता. बटणं नसलेला कुडता तो वापरीत असे. आणि त्याचे कपडे मळलेले असत. पण त्याच्याजवळ उंची फाऊंटनपेन आणि घड्याळ होतं, पायात बूट घालून आणि हातात एक कातड्याची छोटी पिशवी घेऊन दूर कुठंतरी पहात तो चालत असे.

साथी नीलकंठन त्या कष्टकरी जनतेचा नेता, रक्षक आणि गुरू बनला. प्रसंगी आपली नित्य नैमित्तिक कामेही न उरकता तो कामगारांच्यात जाऊन काम करीत असायचा. पण त्याच्यात काहीतरी कमी होतं वा जास्त तरी होतं. त्यामुळे पाण्यावर येणाऱ्या तेलाच्या तवंगासारखा तो वाटायचा.

तुरुंगातून सुटून येणाऱ्या अंतोणि, रोस्कि, सैमन, मत्तायि, कोच्चय्यप्पन आणि शौरीचं शाही स्वागत करायचं असा निर्णय साथी नीलकंठननं घेतला होता. पद्मनाभन, अच्युतन, जोसेफ ही मंडळी ज्या गुप्त सभेला हजर होती त्या सभेत त्यानं सांगितलं होतं की बंडासाठी हुतात्म्यांची आवश्यकता आहे. आणि त्यानं उपदेश केला की हुतात्म्यांचं स्वागत करण्यासाठी आणखी हुतात्मे पाहिजेत. त्यानं असंही सांगितलं की अंतोणिसारख्या माणसांनी कामगारांच्या अगदी सर्वसामान्य हक्कांसाठी आंदोलन केलं होतं. आणि म्हणूनच त्यांचा सत्कार करणं याचा अर्थ कामगारांचे हक्क मानणं असा होतो. कामगारांची संघटित शक्ती प्रदर्शित करण्याची ही एक संधी आहे हेही त्यानं सांगितलं. आणि अशा प्रकारे तुरुंगातून सुटणाऱ्यांचं भव्य स्वागत करण्याचा निर्णय घेतला गेला.

कारखान्यात आणि कामगारांच्या घरीदारी जोरदार प्रचार करण्यात आला. अगदी म्हाताऱ्यांपासून मुलांपर्यंत सगळे कामगार तुरुंगातून सुटणाऱ्यांना बघण्यासाठी आणि त्यांचं स्वागत करण्यासाठी उतावीळ झाले. ॲनानं आपल्या भावांच्या स्वागत सभेला जाण्यासाठी स्वच्छ धुतलेले कपडे घातले. मग तिनं औसेपला विचारलं, "ते इथं आल्यानंतर मग सभेला जातील ना ?"

"नाही. मला असं वाटतंय की मिरवणूक आणि सभा झाल्यावरच ते इथं येतील."

"तर मग आपल्याला तिथं जाऊन उभं राहिलं पाहिजे. म्हणजे येताना ते

आपल्याला दिसतील."

"हं, आपण बरोबरच जाऊ."

दुपार झाली तशी तो दुबळा माणूस आला. त्यानं एक रुपाया ॲनाजवळ दिला. तशी ॲनानं विचारलं, "आज हे काय ?"

"अंतोणि आणि रोक्कि आज येणार आहेत. त्यांनाही जेवण द्यायला पाहिजे ना."

"औसेपदादाचे मुलगे पण यायचेत—"

"त्यांच्यासाठी तिकडं दिले आहेत."

"ते कधी येणार आहेत ?"

"संध्याकाळी."

"मग मला जायला हवं का ?"

"हो. जायला हवं."

जरा वेळ तो खाली मान घालून उभा राहिला. मग एकदम मान वर करून म्हणाला, "कसले विचार चालले आहेत ?"

"कसले विचार ? कुणाला काय सुचतंय ? माझ्या भावांना परत पकडून तर नेणार नाहीत ना ?" बोलता बोलता तिचा गळा दाटून आला.

"नाही. नाही. ते नाही मी म्हणत."

"मग काय ?"

"काय होणार आहे हे अजून ठरलेलं नाही. तऱ्हेतऱ्हेचे विचार चालूच आहेत. कारखान्यात आणि साहेबांच्या बंगल्यावर."

"माझी प्रार्थना एवढीच आहे की माझ्या भावांना कुणी परत पकडू नये. मग जे काय होईल त्याची पर्वा नाही." डोळे पुसत ॲनानं त्याच्याकडं पाहिलं.

ॲनाकडं तो टक लावून पाहू लागला. मग खाली मान घालून ॲनानं त्याला गंभीरपणे विचारलं, "भाई येतील तेव्हा येणार ना?"

"हो." खाली मान घालून तो तसाच उभा राहिला. आणि मग एकदम वळून चालायला लागला.

वळणावरच्या कोपऱ्याशी गेल्यावर त्यानं मागं वळून पाहिलं—ॲना त्याच्याकडंच पहात होती.

अॅनानं तांदूळ, मासे, टोपिओका[1] हे सगळं सामान खरेदी केलं. कांजी तयार केली. टोपिओका शिजवलं. माशाचे पदार्थ तयार केले. पण तिनं स्वत: काहीच खाल्लं नाही. तिच्या भावांचं जेवण झाल्यावर जे काही उरेल ते ती खाणार होती. तिनं धुतलेले कपडे घातले. आपल्या भावांच्या दर्शनासाठी. त्यांच्या स्वागतसभेत जाण्यासाठी ती तयार झाली. कोपऱ्यावरून म्हाताऱ्या औसेपनं ओरडून विचारलं, "पोरी, तू येतेस ना ?"

"आले. आले. दादा जरा थांबा."

रस्त्यावरून ती औसेपबरोबर चालू लागली. अॅना आपल्या भावांना आणि औसेप आपल्या मुलांना पहायला उत्सुक होते. म्हणून मोठ्या आनंदान ते दोघे भराभर चालले होते. गल्लीच्या वळणावर ते पोहोचले तर त्यांना तिथं तीन चार माणसं उभी असलेली दिसली. वरीदुसाहेबाच्या कारखान्यातला मिस्त्री, चहावाला सण्णि आणि तीन चार जण होते. मिस्त्रीनं हसून विचारलं, "दादा आणि लेक बरोबर कुठं चालले आहेत ?"

"आज ते येणार आहेत ना ?" औसेप उत्तरला, "आम्ही तिकडेच चाललोय. मिरवणूक आणि सभा पण आहे."

"ही अशी गप्प गप्प का ?"

"मी काय बोलू मिस्त्री ?" अॅना हळूच म्हणाली.

"बरं, जा, जा !" मिस्त्रीच्या चेहऱ्यावर दबलेल्या रागाच्या रेषा स्पष्ट दिसत होत्या.

औसेप आणि अॅना दोघं चालायला लागले. तेवढ्यात मागून मोठ्यानं हसण्याचा आवाज आला. म्हणून त्यांनी वळून पाहिलं. मिस्त्री आणि त्याचे मित्र त्यांच्याकडे पाहून काहीतरी बोलत मोठमोठ्याने हसत होते.

मिरवणूक चालली होती. घोषणा दिल्या जात होत्या. औसेप आणि अॅना दोघं घाईघाईनं धावत सुटले.

ते पहा ते आले. हजारो लोकांच्यासमोर ते उभे आहेत ! आपल्या मुलांना कवटाळता येत नाही म्हणून औसेपला वाईट वाटत होतं. तर आपल्या भावांपुढं आपल्याला रडता येत नाही म्हणून अॅना निराश झाली होती. गर्दीतून वाट

---

१ एक प्रकारचं कंदमूळ.

काढत ते पुढे जाऊ लागले. तेवढ्यात कुणीतरी म्हणालं, "ती अंतोणीची बहीण आहे !"

सर्वांनी तिला वाट दिली. दुसऱ्या रांगेत त्यांना जागा मिळाली. मग औसेपनं अॅनाच्या कानात सांगितलं, "आई गेल्याचं त्यांना आत्ताच सांगू नकोस."

खाली मान घालून ती मिरवणुकीबरोबर चालली होती.

अंतोणि, रोक्कि, मत्तायि, कोच्चय्यप्पन आणि शौरि पुढं चालले होते. त्यांच्या गळयात लाल फुलांचा एक एक हार होता. नीलकंठन सर्वांच्या मध्ये होता. त्याच्या गळयात तर लाल फुलांचे कितीतरी हार होते. तो मूठ उंच करून मोठ्याने ओरडत होता, "इन्किलाब झिंदाबाद !"

पद्मनाभन, अच्युतन, जोसेफ आणि शंकु त्याच्या घोषणेला प्रतिसाद देत होते. इतर लोक घोषणा देत नव्हते. कारण त्यांना त्या घोषणेचा अर्थच समजत नव्हता.

"ते काय आहे ?" एका कामगारानं आपल्या जवळच्याला विचारलं.

"काय"

"इन्किलाबचा अर्थ काय ?"

"ती काहीतरी मोठी गोष्ट आहे."

"जमीनदार, भांडवलदार, साम्राज्यवादी या सगळयांचा नाश झाला पाहिजे !" पुन्हा नीलकंठनने घोषणा दिली.

पद्मनाभन आणि त्याच्या मित्रांनीच तिला प्रतिसाद दिला. साथी नीलकंठननं रागानं मागं वळून पाहिलं. पद्मनाभननं मग त्याच्या कानात सांगितलं, "लोकांना काही समजत नाही. म्हणून ते ओरडत नाहीत."

"सगळया देशातल्या कामगारांनो, एक व्हा !" साथी नीलकंठनने मूठ उंच करून घोषणा दिली. हजारो कंठातून मग त्याचा प्रतिध्वनी उमटला.

"भांडवलशाही मुर्दाबाद."

सर्वजण परत तेच ओरडले.

"बंडाचा विजय असो !"

सर्वजण परत तेच ओरडले.

सारं शहर थरथरायला लागलं. रस्त्याच्या दोन्ही बाजूला उभ्या असलेल्या प्रेक्षकांच्या चेहऱ्यावर भीतीची छाया पसरली. एकानं विचारलं, "बंड म्हणजे

काय ?" जवळच उभ्या असलेल्या एका शिकलेल्या माणसानं उत्तर दिलं. "भांडवल-दार, पोलीस आणि अधिकारी यांना ठार मारणं म्हणजे बंड !"

दोघंही सूचक हसले.

लोकांचा तो प्रवाह समुद्राप्रमाणं मैदानावर पसरला. व्यासपीठ आधीच तयार केलं होतं. त्यावर साथी नीलकंठन आणि तुरुंगातून सुटलेले लोक आले. अॅना आणि औसेप व्यासपीठाच्या जवळच उभे होते. साथी नीलकंठनवर हजारो डोळे केंद्रित झाले होते.

सभासदात त्याच्याबद्दल आदर होता. पण काही लोक कुजबुजत होते, 'फार शिकली सवरलेली बडी माणसं आहेत ही !' 'त्यांच्या घरी हत्ती आहे.' 'मंत्री होण्या इतकं शिक्षण झालंय पण गरीबांच्या उद्धारासाठी बाहेर पडले !'

साथी नीलकंठनं गांभीर्यानं चहूबाजूंना पाहिलं. मग तो करुण असा हसला. मग त्यानं मागं वळून हळूच काहीतरी सांगितलं. पद्मनाभन व्यासपीठावर चढून पुढं उभा राहिला. त्यानं माणसांच्या समुद्राकडं एकदा पाहिलं. त्याचं शरीर थरथरलं. त्याला काहीतरी बोलायचं होतं. पण त्याच्या तोंडून शब्द उमटले नाहीत.

साथी नीलकंठननं आपल्या गळयातला लाल फुलांचा हार काढला. त्यानं पद्मनाभनला बाजूला केलं आणि स्वतः पुढं उभा राहिला.

"मित्रांनो ! ........" त्यानं भाषणाला आरंभ केला.

सभेच्या एका कोपऱ्यात अचानक खळबळ उडाली. कुणीतरी जोरात ओरडलं, "अंतोणि आणि रोक्कीच्या—" पुढं शब्द आले नाहीत.

"घराला आग लागली. मिस्त्रीनं लावली !" दुसऱ्यानं वाक्य पुरं केलं.

"अग आई ग !" अॅना ओरडली आणि एकदम अंतोणीच्या अंगावर कोस-ळली. मत्तायि आणि सैमननं म्हाताऱ्या औसेपला आधार दिला.

तो माणसांचा समुद्र उफाळू लागला.

"कोणीही जाग्यावरून उठू नका हलू नका–" मेघगर्जनेसारखे साथी नील-कंठनचे शब्द घुमले. कोणीही हललं नाही.

"रोक्कि कुठंय ?" अंतोणीनं विचारलं.

पण रोक्कि तिथं कुठं दिसला नाही.

# [१६]

मिस्त्री आणि त्याच्या साथीदारांनी अंतोणीच्या आणि मत्तायीच्या घराला आगी लावल्या होत्या. छोटया साहेबाच्या आज्ञेप्रमाणंच हे झालं होतं.

कारखान्यात खळबळ उडवणं आणि अशी खळबळ उडवणाऱ्यांचं जोरदार स्वागत–या गोष्टी छोटे साहेब कसे सहन करतील ? जेव्हा स्वागत सभा होईल त्याचवेळी झोपडी जाळून टाकायची असा छोटा साहेबांनी निश्चय केला होता. म्हणजे ते झोपायला येतील तर झोपडी जळलेली असेल !

बडया साहेबांनी हा निर्णय ऐकला तेव्हा त्यांनी असं काही न करण्याविषयी आपल्या मुलाला सांगितलं. त्यांनी कारखाना सुरू केला तेव्हा औसेपच त्यांच्या-बरोबर होता. पैसे त्यांचे होते पण प्रयत्न औसेपचा होता. अखेर साहेब बंगल्यावर पोहोचले. औसेप त्यांच्याच भूमीवर राहू लागला. साहेबांना हे सगळ आठवलं. त्यांच्या अंतरात्म्याला खेद झाला. त्यांनी आपल्या मुलाला सांगितलं,

"असं करण्यानं देव कोपेल. तो आमचा कामगार होता, आमचा माणूस आहे. त्याचं मरण त्याच्या घरातच येऊदे–"

"तर मग बाबा, तुम्ही जसं मला सांगता तसं तो त्यांना का सांगत नाही ? कारखान्यात दंगल करू नका असं का नाही त्यांना सांगत ? त्यांना तो का नाही सांगत की ते साहेबाची भाकरी खातात. साहेबाच्याच जमीनीतलं पाणी पितात आणि साहेबानंच केलेल्या झोपडीत रहातात !"

"मुलं वाईट निघाली तर बापाचा काय अपराध ?"

"पण मुलं वाईट निघाली तर त्यांना वळणावर कसं आणायचं ते मला माहीत आहे."

"पण वाईट काम काही करू नकोस."

"आमचं दुर्दैव तर हे आहे की आम्हाला त्रास देणारे लोक आमच्याच जमीनीवर रहातात !"

बडया साहेबांनी आपल्या मुलाबरोबर आणखी वादविवाद केला नाही. पण खोल कुठंतरी त्यांना त्रास होत होता.

काहीतरी होणार असं त्या दुबळ्याला पहिल्यापासूनच वाटत होतं. कुट्टप्पनच्या चहाच्या दुकानात बसल्यावर त्याला समजलं होतं की चहाच्या दुकानातच काही कारस्थान चाललं आहे. म्हणून जेव्हा सगळे कामगार सभा मिरवणुकीला गेले तेव्हा तो एकटाच अॅनाच्या घराभोवती लपून छपून हिंडू लागला.

संध्याकाळ झाली तेव्हा मिस्त्री आणि त्याचे साथीदार दोन तुकड्यांनी अंतोणीच्या आणि मतायीच्या घरात घुसले. अंतोणीच्या घरात मिस्त्री घुसला तेव्हा त्याच्या पाठोपाठ तो दुबळाही घुसला. मिस्त्रीनं आगकाडीची काडी पेटवली, छपराला आग लावली. या दुबळ्यानं ती लगेच विझविली.

मग अचानक त्याच्या गालावर एक थप्पड बसली. तो खाली पडला तेव्हा त्याला दोन चार लाथाही खाव्या लागल्या.

"याला इथून न्या आणि नारळाच्या झाडाला बांधून ठेवा." मिस्त्रीनं हुकूम दिला.

बेहोष झालेला तो दुबळा माणूस नारळाच्या झाडाला बांधला गेला.

शेजारपाजारच्या घरात केवळ बायका होत्या. त्यापैकी कोणाचीच घराबाहेर येण्याची हिंमत झाली नाही. त्या ओरडू देखील शकल्या नाहीत. वेलायुधनची आई मात्र हळूच बाहेर पडली आणि पळत पळत सभेच्या ठिकाणी गेली. अशा तऱ्हेनं ही बातमी सभेच्या पर्यंत पोहोचली.

साथी नीलकंठननं सभासदांना सांगितलं की, 'सभा चालू असताना झोपड्या जळाल्या, भूकंप झाला तरी मजुरांनी न घाबरता आदेशाचं पालन केलं पाहिजे.' अशा तऱ्हेनं त्यानं अनुयायांची आदेशाच्या बाबतीत परीक्षा घेतली. कामगारांनी आपल्या नेत्याच्या आज्ञेचं पालनही केलं.

रोक्कि व्यासपीठावरून विजेच्या वेगानं नाहीसा झाला. अॅनाचा हात धरून अंतोणि आणि औसेपला सांभाळून नेत मतायि आणि सैमन पण तेथून निघून गेले. मेघगर्जनेप्रमाणं साथी नीलकंठचे शब्द घुमत होते—

"जगाचं शासन चालवण्याचा अधिकार कामगारांचा आहे. कारण जगातील धनदौलत आणि संस्कृतीची निर्मिती कामगारांनी केली आहे."

अंतोणीचा हात सोडून अॅना चालत होती. चालता चालता ती म्हणाली "दादा, आपण पण जायचं?"

"कुठं?"

"जिथं आपले आईवडील गेले आहेत—"

"आई कुठाय ?"

मग एकदम ॲनाला आठवलं. थांबून थांबून ती म्हणाली, "आई ? आई ना, तिकडं आहे."

"काय आई तिकडं आहे ?" अंतोणीनं विचारलं आणि तो धावत सुटला. त्याच्या पाठोपाठ ॲना.

शिकार फस्त केल्यावर सिंह जसा गप्प बसून राहतो तशी आग गप्प झाली होती. गल्लीतल्या आणि शेजारपाजारच्या बायकांचे पुंजके उभे होते. विझलेल्या आगीच्या अंधुक प्रकाशात नारळाच्या झाडाला बांधलेला माणूस कण्हत होता.

"आई—माझी आई" असं म्हणत अंतोणि जळून राख झालेल्या घरात घुसला. "दादा दादा" मागून आलेल्या ॲनानं अंतोणीला एकदम मिठीच मारली.

उभ्या असलेल्या बायका स्फुंदून स्फुंदून रडत होत्या.

"कुठंय ? आई कुठंय ?" अंतोणीनं विचारलं.

"दादा, आई गेली—बाबांना कांजी करून द्यायला आई गेली."

अंतोणि बेहोष झाला. ॲनानं त्याला सांभाळून झोपवलं.

"ॲना" कण्हण्याचा आवाज.

ॲनानं घाबरून चहूकडं पाहिलं.

पुन्हा तशीच हाक आणि तसंच कण्हणं.

ॲना उठली. जिथून कण्हण्याचा आवाज येत होता तिकडं गेली.

"अगं आई ग, हे काय ! देवा देवा." ती पण बेहोष झाली.

"वाट द्या. वाट द्या." गल्लीत एकच आवाज.

"मोठे मालक येत आहेत !"

म्हातारे वरीदुसाहेब काठी टेकत टेकत हळूहळू येत होते. सर्वांनी त्यांना वाट दिली. कुणी काहीच बोललं नाही. अंतोणीजवळ येऊन त्यांनी एकदा मागं पाहिलं.

"ओ मसीहा !" आकाशाकडं पाहून ते उद्‌गारले आणि आपले डोळे पुसले.

वेलायुधनच्या आईनं अंतोणीच्या तोंडावर पाणी मारलं. अंतोणीनं डोळे उघडले.

"ते कोण आहेत ? मोठे मालक ?" त्यानं धीरानं विचारलं.

तो उठून बसला आणि त्यानं वेलायुधनच्या आईला विचारलं, "माझी आई कुठाय ?"

वेलायुधनची आई तोंडावर पदर घेऊन स्फुंदू लागली. अंतोणि उठून ॲनाजवळ गेला. वेलायुधनच्या आईनं ॲनाच्या तोंडावर पाणी शिंपडलं. तिनं पण डोळे उघडले.

तो दुबळा माणूस अजूनही कण्हतच होता. अंतोणीनं त्याला बंधमुक्त केलं आणि त्यालाही खाली झोपवलं. ॲना त्याच्याजवळ बसली. तिनं त्याच्या तोंडात पाणी घातलं. हळूहळू तो पाणी पिऊ लागला. त्याला जिथं जिथं मार दिला होता. त्या जागेवरून ॲनानं हात फिरविला. अंतोणीनं ॲनाचं मस्तक कुरवाळलं.

आणि अचानक भयंकर आवाज ऐकू आला. एखाद्या महासेनेच्या आक्रमणाची सूचना देणारा आवाज असावा तसा. अंतोणी घाबरून मोठ्या मालकांजवळ गेला आणि म्हणाला, "मालक, आपण इथं थांबू नका."

"थांबलं तर काय होईल ?"

"सभा संपवून लोक यायला लागले आहेत. आपण इथं थांबू नका. जा . जा. लवकर जा."

मालक चालू लागले.

तेवढ्यात दम टाकत शंकु आला आणि अंतोणीला म्हणाला, "मिस्त्री मरायला टेकला आहे. त्याला इस्पितळात नेत आहेत !"

"रोक्कि कुठाय ?"

"ओ."

# [१७]

घर जळाल्याची बातमी ऐकताक्षणीच रोक्कि सभा सोडून धावत आला. पण रस्त्यावरून तो केवळ एकदाच आपलं घर पाहू शकला. आता तर घराची राखरांगोळी झाली होती. आजूबाजूच्या बायका गप्प उभ्या होत्या. रोक्कीनं विचारलं, "माझी आई कुठाय् ?"

कोणीच काही उत्तर दिलं नाही. अंतोणि आणि रोक्कीला अजून एली गेल्याचं कळलं नव्हतं. तुरुंगात त्यांना मुद्दामच ही बातमी कळविण्यात आली नव्हती.

"आई" रोक्कि मोठ्यानं ओरडला आणि घराच्या दिशेनं धावला.

वेलायुधनच्या आईनं त्याला अडवलं—

"बेटा, तुझी आई गेली—"

"गेली, कुठं गेली ?"

"निघून गेली."

"मी विचारतोय् कुठं गेली ?"

"निघून गेली—वारली."

"आई आई" रोक्कीनं हंबरडा फोडला. आणि जळत्या घराच्या चारी बाजूंनी धावू लागला.

नारळाच्या झाडाला बांधलेला दुबळा माणूस एकदा कण्हला. पण रोक्कीनं त्याला पाहिलं नाही.

"आई आई———" एखाद्या वेड्यासारखं ओरडत रोक्कि रस्त्यावरून धावायला लागला. वेलायुधनच्या आईनं त्याला अडवलं आणि ती त्याला म्हणाली, "तुझी आई वर गेली."

"काय, माझ्या आईला मारलं ?" तो परत धावायला लागला.

वर गेलेल्या आईचा तो शोध करीत होता. गल्लीतून रस्त्यावर बराच वेळ धावल्यावर तो दुसऱ्या गल्लीत पोहोचला. आपण कुठं चाललो आहोत हे त्याला माहीत नव्हतं. तो वेगात चालला होता. त्या गल्लीत सगळीकडं अंधार होता आणि

रस्त्यावर कुणीच नव्हतं. तेवढ्यात त्याला एका घरातून आवाज ऐकू आला. तो आवाज मिस्त्रीचा होता. एका आरामखुर्चीवर पडून मिस्त्री आपल्या बायकोला आणि मुलाला व्याख्यान देत होता.

"ज्यांना डोकं टेकण्यापुरती देखील जागा नव्हती आणि जे इकडं तिकडं भटकत होते त्यांना मोठ्या मालकानं झोपड्या तयार करून वसवलं. त्यांना कारखान्यात कामं दिली. आता तीच माणसं मालकाला सतवायला लागली. मालकाच्या जमीनीवर झोपडी बांधून रहायचं, मालकानं दिलेली कांजी प्यायची आणि मालकाला छळायचं—— मी हे चालू देणार नाही. ते सभा घेतात; कशाला? मालकांना शिव्या द्यायला ! आणि नंतर त्यांना असं वाटतं की सभा झाल्यावर मालकानं दिलेल्या झोपडीत जाऊन आरामात झोपू—हे आता होणार नाही."

"आग लावली तेव्हा झोपडीत ती मुलगी होती ?" मिस्त्रीच्या बायकोनं विचारलं.

"नाही. ती सभेला गेली होती."

रोक्कि एकदम घरात घुसला. दिव्याच्या उजेडात आरामखुर्चीवर पडलेल्या मिस्त्रीच्या छातीवर त्यानं एक जोरात ठोसा दिला. आणि त्यानंतर आणखी चार पाच ठोसे दिले. त्यामुळं मिस्त्रीला धड उठता येईना आणि त्याला अडवता येईना. बायको अडवायला गेली तशी तिलाही दोन तीन थपडा हाणल्या. शेजारी पाजारी यायच्या आत रोक्कीनं मिस्त्रीला ढकलून दिलं आणि चारपाच लाथा लगावल्या.

"पुन्हा अशी कुणाच्या घराला आग लावू नकोस." असं बजावून रोक्कि तिथून निघून गेला.

सगळ्या घटना अचानक घडल्या होत्या. मिस्त्रीच्या घरी जाऊन त्याला मारायचं असा रोक्कीनं विचार देखील केलेला नव्हता. रस्त्यावरून तो धावत सुटला. आरडाओरडा ऐकून धावत आलेल्या एका शेजाऱ्याशी त्याची टक्कर झाली. तशी तो एकदम ओरडला, "चोर चोर —— तो पहा चोर !"

रोक्कि खूप वेगानं धावला आणि एका वाळूच्या ढिगापलीकडं नाहीसा झाला. मग तो वाळूवर बसला. त्याच्या तोंडाला कोरड पडली होती. तुरुंगात गेल्यापासून आत्तापर्यंत त्याला कपभर चहादेखील मिळाला नव्हता. एक कपभर चहा आणि एक विडी मिळाली तर देवा किती बरं होईल.

रोक्कि उठून चालायला लागला. झाडा झुडुपातून वाट काढत तो रस्त्यावर पोहोचला. थोडं लांब गेल्यावर त्याला एक चहाचं दुकान दिसलं. पण ते बंद होतं. दुकानाच्या ओसरीवर तो बसला आणि त्यानं चारी बाजूला पाहिलं. तिथं त्याला एक पाण्याचं भांडं दिसलं. ते उचलून पाहिलं त्यात थोडं पाणी होतं. पाणी चांगलं आहे. ना हे त्यानं थोडं पिऊन पाहिलं आणि मग बाकीचं प्यायलं. आणि मग तो तिथंच झोपला.

सकाळ झाली तेव्हा दुकानदारानं त्याला हलवून जागं केलं. तो उठला. दुकानदारानं दुकान उघडलं. चूल पेटवली आणि आधण ठेवलं. जरा वेळानं चहा तयार झाला. एक ग्लास चहा रोक्कीला हवा होता. पण रोक्किजवळ पैसे नव्हते आणि दुकानदारही त्याच्या ओळखीचा नव्हता.

तो रस्त्यावर उतरला. गावाच्या दिशेनं चालू लागला. मागच्या सगळ्या घटना आठवू लागला. त्या मिरवणुकीच्या पुढं त्याचं छाती पुढं काढून चालणं, कामगारांची ती प्रेमयुक्त दृष्टी, व्यासपीठावरून दिसणारा माणसांचा समुद्र आणि आपण भाषणात काय सांगायचं याचा त्याच्या मनात चाललेला विचार.

त्यानं मनात तयार केलेलं भाषण काय होतं ? अध्यक्ष नाव घेऊन हाक मारतील. तेव्हा तो उठेल आणि त्या विशाल सभेत म्हणेल—

"झिजून झिजून मरण्यापेक्षा एकदम मेलेलं बरं कारण—"

अचानक टाळी वाजवण्याचा आवाज आल्यामुळं रोक्कीनं वळून पाहिलं. रस्त्याच्या उजव्या बाजूला असलेल्या एका काजूच्या झाडाखालून शंकु टाळ्या वाजवून रोक्कीला बोलावत होता.

"इकडं ये."

रोक्कि शंकित होऊन उभा राहिला.

"जरा इकडं ये ना !"

रोक्कि शंकुजवळ गेला. शंकु त्याला हळूच म्हणाला, "आता तू तिकडं जाऊ नकोस."

"गेलं तर काय होईल ?"

"गेलं तर काय होईल ? सांगतो. पण आता जाऊ नकोस."

"पण गेलं म्हणून काय झालं ?"

"पोलीस तुला शोधत आहेत. अंतोणि, मत्तायि, सैमन, अच्युतन, पद्मनाभन,

जोसेफ आणि पप्पन सगळ्यांना पोलिसांनी पकडून नेलंय."

"कशाबद्दल ?"

"मिस्त्रीला मारलं म्हणून."

"मिस्त्रीला मी मारलं."

"तू ? त्यांना तर त्यांनीच मारलं असं सांगून पकडून नेलंय."

"तर मग मी तिकडं जातोच. मीच मारलं म्हणून मी सांगीन. मी सांगेन माझं घर जाळलं म्हणून मी मारलं."

"नको नको. तू जाऊ नकोस. तुला ते मारतील."

"त्यांना मारायचं असेल तर मारू दे. मी चाललो."

"रोक्कि, जाऊ नकोस. मी सांगतो ते ऐक. पोलिसांनी त्यांची अगदी चटणी केलीय. त्यांच्या हातात तू सापडलास तर तुलाही मारतील !"

त्यानं रोक्कीचा हात जबरदस्तीनं पकडला. त्यानं विचारलं, "मग काय करायला पाहिजे ?"

"तू इथंच थांब. आपला संघ आहे आणि आपले पुढारी लोक पण आहेत. चल आधी चहा पिऊन घेऊ."

रोक्कीचा हात धरून शंकु चालू लागला. रोक्कीनं विचारलं, "माझ्या आईला तू पाहिलंस ?"

"तुझी आई ? ती तर स्वर्गात गेली तुझ्या वडिलांना कांजी करून द्यायला–"

रोक्कि काहीच बोलला नाही. ते दोघं चहाच्या दुकानात शिरले. दोघांनीही तांदुळाच्या आटयाचा पिट्टु[1] आणि फुटाणे खाल्ले. चहा प्यायले. रोक्कीनं एक मोटी विडी ओढली.

मग रस्त्यावर उतरून ते चालू लागले. मग रोक्कीनं विचारलं, "माझी धाकटी वहीण कुठाय् ?"

"ती तिकडंच आहे !"

"कुठं ?"

"नव्या झोपडीत."

"नवीन झोपडी कुठून आली ?"

---

१ पिट्टु–मोदकासारखा एक खाद्यपदार्थ.

"दोन्ही झोपड्या जळाल्या तेव्हा उजाडायच्या आत त्याच जागी दोन नव्या झोपड्या उभ्या करण्यात आल्या."

ते खरंच होतं. जळलेल्या झोपड्यांच्या जागी सकाळ व्हायच्या आत दोन नव्या झोपड्या उभ्या करण्यात आल्या. मारहाण सहन करावी लागल्यामुळं थकलेला असतानाही त्या दुबळ्यानं कामगारांच्या कानात काहीतरी सांगितलं आणि पद्मनाभननं त्यांना बोलावून म्हटलं, "पहाट व्हायच्या आत नव्या झोपड्या झाल्या पाहिजेत."

जोसेफ म्हणाला, "जुनं नाहीसं झाल्यावर त्या जागी नवं आलं पाहिजे."

सर्वांनी त्या आवाजात आपला आवाज मिळविला. कुठून कुणास ठाऊक पण नारळाच्या झावळ्या, तट्ट्या, दोऱ्या सर्व काही आलं आणि सूर्योदय व्हायच्या आत दोन्ही झोपड्या उभ्या राहिल्या.

ॲनाचा हात धरून अंतोणीनं नव्या घरात प्रवेश केला. गहिवरल्या स्वरात मग तो म्हणाला, "जुनं सगळं गेलं. आई, बाबा, घर! आता नवा खेळ सुरू झाला आहे."

सकाळ झाली तशी पोलीस आले. त्यांनी अंतोणीला हातकड्या घातल्या.

"हे काय ?"

एक जोरदार ठोसा—त्याच्या प्रश्नाचं उत्तर म्हणून !

"ओ मसीहा !" ॲना खाली पडली.

## [१८]

औसेपचं प्रेत घेऊन मत्तायि आणि सैमन नव्या घरात शिरले. अग्निसंस्कार होण्याआधीच पोलिसांनी त्या दोघांना पकडून नेलं. वेलायुधनच्या आईनं एक सुस्कारा सोडला आणि आकाशाकडं पहात ती म्हणाली, "माझ्या कणिच्चकोलंगरे[1]च्या आई !"

---

1 दुर्गामातेचं देऊळ असलेलं गांव.

पद्मनाभन, अच्युतन, जोसेफ, अंतोणी, मत्तायि आणि सैमन यांना हातकड्या घालून पोलीस रस्त्यानं पायीच नेत होते. लोकांचा एक मोठा समूह त्यांच्या पाठोपाठ चालला होता. तो दुबळा त्या गर्दीत विजेसारखा दिसत होता. पुलाजवळ पुट्टू विकणाऱ्या एका म्हातारीनं एका रिक्षेवाल्याला विचारलं, "कालच ते तुरुंगांतून सुटले ना ?"

"हो".

"मग आज त्यांना का परत पकडलंय ?"

"मिस्त्रीला त्यांनी मारलं ना, तो आता इस्पितळात आहे !"

"कोण मिस्त्री ?"

"वरीदु साहेबाच्या कारखान्यातला मिस्त्री."

"त्यांनी मिस्त्रीला का मारलं ?"

"असं म्हणतात की मिस्त्रीनं त्यांच्या घराला आग लावली."

"मग मिस्त्रीला मारून घर थोडंच मिळणार आहे ?"

"मिस्त्रीलाही मारलं आणि घरही झालं !"

"मालकांना आणि मिस्त्रीला मारलं तर——"

"मारलं तर काय होतं ?"

"ते देवाला आवडणार नाही."

"ते म्हणतात देव नाहीच——"

"म्हणूनच त्यांना असं नेलं जातं."

"येशू आणि अंतोणि सारखेच आहेत ?"

"मग त्यांच्यात काय फरक आहे ?"

"भाऊ, तू गप्प बैस. देव आणि अंतोणि तुम्ही सारखेच म्हणता, काय वेडबिड लागलंय काय ? जेव्हा कामगार मालकाच्या आणि मिस्त्रीच्या समोर येतात तेव्हा ——"

"तेव्हा काय त्यांना नमस्कार करायला पाहिजे ?"

"अर्थातच. मालक व मिस्त्री आहेत म्हणून तर कामगारांचं पोट भागतंय् !"

चहाच्या दुकानात, पानाच्या दुकानात, बंदरावर, बसस्टँडवर, बाजारात, मंडईत सगळीकडे या गरम गरम बातम्या पोहोचल्या. तो दुबळा माणूस एखाद्या वादळासारखा सगळीकडं दिसू लागला. त्या वादळानं कामगारांच्या कानात शीळ

घातली. एका कारखान्याच्या दारातून दुसऱ्या कारखान्याच्या दारात असा तो जणू पंख लावूनच हिंडला. कारखान्यातल्या मागांवर आणि दोऱ्यांमध्ये खळबळ उडाली.

कुट्टप्पनच्या चहाच्या दुकानातही, दबलेला राग उसळला. दात ओठ खातच कुट्टप्पन कपात चहा भरत होता. टेबलावर ग्लास ठेवताना देखील कधी नव्हे एवढा तो जोर करीत होता. त्याच्या होकारात आणि प्रत्येक शब्दात नुसता राग भरून राहिला होता.

मण्णीच्या चहाच्या दुकानातही क्रोधाचं अस्तित्व होतं. मण्णि जोरात ओरडत होता, "ईषव लोकांनीच मारहाण केली. ख्रिस्ती कधी मारायचे नाहीत. ख्रिस्त्यांना पैसे मिळाले की ईषव नुसते जळायला लागतात."

तशी विडीचा दुकानदार वासु आपली कात्री फिरवीत विचारू लागला, "मग पोलिसांनी ख्रिस्त्यांना का पकडलं ?"

"कुणी सांगितलं ते ख्रिस्ती होते म्हणून ? ते ईषवच आहेत. ख्रिस्ती मारायचे नाहीत."

"तर मग ख्रिस्ती फक्त घरांना आगी लावतात का ?" वासूनं तिरकसपणे विचारलं.

"ईषवांनीच आग लावली ती."

"मग तुम्ही पण पूर्वी ईषवच होतात !"

मण्णि चाकू घेऊन दुकानाच्या बाहेर पडला. वासु कात्री फिरवीत उभा राहिला.

तिथं चहा पीत बसलेला तो दुबळा माणूस एका कामगाराच्या कानात काहीतरी सांगून तिथून निघून गेला. मण्णि आणि वासु या दोघांचं भांडण मिटवायला गेलेल्या लोकांना तो कामगार म्हणाला, "तुम्ही सर्वजण बाजूला व्हा. हे दोघंही दोन मालकांचे पोसलेले गुंड आहेत. त्यांना खुशाल मारामारी करू द्या."

मण्णि आणि वासु आपापल्या हातातील चाकू आणि कात्री फिरवीत आपापल्या जाग्यावर जाऊन बसले.

  

बंदरावर उभ्या असलेल्या प्रवाश्यांच्या मनात एक शंका निर्माण झाली, 'बंड म्हणजे काय ?'

एक प्रवासी म्हणाला, 'बंड म्हणजे भांडवलदारांना मारणं !'

'मारून ते जाणार कुठं ?'

'ते आम्हाला काय माहीत ? जो मारतो त्याला विचार ?'

दुसऱ्यानं विचारलं, 'पण मारायचं का ?'

'त्याचे पैसे पळवायला.'

'पण पैसे पळवून नेणार कुठं ?'

तो दुबळा एका हमालाच्या कानात काहीतरी सांगून नाहीसा झाला. मग हमालानं प्रवाशांना जाऊन विचारलं, "तुम्हाला कसली माहिती हवीय् ?"

"आम्हाला ज्याची ज्याची माहिती हवीय्—" एका प्रवाशानं रागानं विचारलं, "त्या सगळ्याची तू माहिती देणार आहेस का ?"

"सगळ्याची काही नाही पण———"

"जा. आपला रस्ता सुधार !" हमाल निघून गेला. प्रवासी मग तिरस्कारानं म्हणाला, "मोठा आलाय आम्हाला शिकवायला !"

संध्याकाळ सरली. अंधार पसरला. आणि ती भयंकर बातमी शहरात पसरली. वेलायुधनच्या आईनं ती पहिल्यांदा अॅनाला सांगितली—

"छोट्या मालकांना दगडानं मारलं म्हणे."

"कुणी ?" अॅनानं उत्सुकतेनं विचारलं.

"असंच कुणीतरी. त्या दगडामुळं त्याच्या डोक्याला जखम झाली आहे. फटफटीवरून चालले होते तेव्हा दगड मारला. तशी एकदम ते गाडीवरून खाली पडले आणि त्यांचा हात तुटला."

काही वेळ गप्प राहून अॅनानं परत विचारलं, "आमचा धाकटा भाऊ निकडं कुठं आहे का ?"

"आँ"

अॅनानं आकाशाकडं पाहिलं आणि ती म्हणाली, "ओ मसीहा !"

मग वेलायुधनची आई म्हणाली,

"मुली, तू इथं राहू नकोस. काळोख पडलाय्."

"मग मी कुठं जाऊ ?"

"तू माझ्याबरोबर चल."

"नाही. नाही. मी इथंच राहणार."

"एकटी ?"

"हो. एकटी. धाकटा भाऊ आला तर—"

"तर मग आत जाऊन दार लावून घे."

ओसरीवर ठेवलेला रॉकेलचा दिवा घेऊन ॲना आत गेली आणि तिनं दिवा बंद केला. वेलायुधनची आई मग तिथून निघून गेली.

ॲनानं दिवा विझवला. दार उघडून बाहेर आली. आजूबाजूच्या घरातून प्रकाश दिसत होता. केवळ अंतोणीचं घर अंधारात बुडून गेलं होतं. निःशब्द शांतता सर्वत्र पसरली होती. भयकारक शांतता.

ॲनानं आकाशाकडं पाहिलं. आकाशाच्या पलीकडे तिचे आईवडील असलेला स्वर्ग ! कदाचित् ते दोघे चांदण्यांच्या सज्जातून तिच्याकडं पाहात असतील. तिच्याकडं हात दाखवून तिला बोलावीत असतील.

रस्त्यावरून चालण्याची चाहूल लागली. ॲनानं नीट पाहिलं—कुणीतरी येत होतं.

"कोण आहे ?" तिनं गंभीरपणे विचारलं.

"मी आहे." तो दुबळा माणूस तिच्याजवळ आला. आणि तिला त्याने विचारलं, "खाल्लंस का काही ?"

ॲनानं काहीच उत्तर दिलं नाही. त्यानं आपल्या हातातली टोपली तिच्यापुढं केली आणि तो तिला म्हणाला, "यात पुष्कळ आहे. काहीतरी खा."

ॲनानं टोपली घेतली आणि म्हणाली, "आता मला काही नको."

"मग मला—"

"तुम्ही नाही काही खाल्लं ?" ॲनानं उत्सुकतेनं विचारलं.

"थोडी कांजी मिळाली तर—"

"चला मी कांजी करते. बसा."

"पण कांजी फक्त माझ्या एकट्यापुरती नाही हं—"

"मग कुणासाठी ?"

"दोघांसाठी."

"हं."

स्तब्धता. दोघं खाली मान घालून उभे होते. मग तो म्हणाला, "मी जरा जाऊन येतो."

"येणार ना ?"

"हो. आलोच."

तो जाणार होता. पण गेला नाही. ॲनाच्या तिथंच थांबला.

"ॲना" त्यानं हाक मारली.

"हं." ॲना मधुर स्वरात उत्तरली.

कुठून तरी दुरून आरडा ओरडा ऐकू आला. "ते काय ?" ॲनानं घाबरून विचारलं.

"पोलीस——आत जाऊन दार लावून घे."

आणि तो विजेसारखा नाहीसा झाला.

## [१९]

त्यादिवशी पहाटे कोंबडा ओरडलाच नाही. त्या भयानक शांततेचा भंग करण्याचं साहस बहुधा कोंबडा करू शकला नाही.

काय ही परिस्थिती ! मिस्त्रीच्या घरात घुसून त्याला मारलं आणि त्याला दुबळा करून टाकलं. रस्त्यावरून फटफटीवरून जाणाऱ्या छोटया मालकांना दगड मारून पाडलं आणि त्यांचा हात मोडला. सर्व भांडवलदार सावध झाले. सत्तेच्या तांडवनृत्याला आता सुरूवात झाली होती.

ॲनानं दरवाजा घट्ट लावून घेतला आणि जमीनीवर चटई टाकून ती अंधारात डोळे बुडवून पडली. तिला सारखं असं वाटत होतं की, शहरात या काळोखी शांततेत निश्चित काहीतरी घडत असलं पाहिजे ! आपल्या झोपडीवर कोणत्याही क्षणी कुणीही चालून येईल असंच तिला मग क्षणभर वाटलं !

ती एकटी आहे. दारिद्रय आणि संकटं यातच ती जन्मली. पण गरीबीची आणि अडचणींची तिला प्रत्यक्ष अशी झळ लागली नाही——तिच्या आईबापांनी

आणि भावांनी तिला त्यापासून अलिप्त ठेवली. लहानपणाचे दिवस मौजेचे होते. पण जेव्हा तिनं तारुण्यात प्रवेश केला तेव्हा एक एक संकट डोकं वर काढू लागली. आणि आता एक एक करीत अनेक झालेल्या संकटांनी तीच्याभोवती जणू फेर धरला होता.

आई जेव्हां, 'वडिलांना स्वर्गात कांजी करून द्यायला जाते.' असं म्हणायची तेव्हा तिला तो शुद्ध वेडेपणा वाटायचा. पण तिचे दोन्ही भाऊ कारखान्यात खळबळ माजवू लागले नि मालकाला आणि मिस्त्रीला सतावू लागले तेव्हा त्यांचा हा वेडेपणा तिला समजूच शकला नाही ! समजून घेण्याची तिची इच्छाही नव्हती. ते बाहेर कुठंही काही करोत पण कमल्याही लफड्यात न सापडता घरी येवोत एवढीच तिची देवाजवळ प्रार्थना होती.

आणि तो दुबळा ? तो तर तिला कधीच समजला नाही ! तो कुठून आला? का आला ? त्याचे आईबाप कोण ? त्याला बहिणी आहेत का नाही ? मग तिला आठवलं की, त्याच्याबद्दल बोलताना एक दिवस तिची आई म्हणाली होती की, 'तो मारायला आला आहे !'

हे बरोबर आहे का ? तो काय त्या लोकांचा जीव घ्यायला आलाय् ? आणि त्यांना मारून याला काय मिळणार ? कुणास ठाऊक ! तिला काहीच माहीत नव्हतं !

ते दुबळं शरीर—रुंद कपाळ आणि चमकणारे डोळे. त्या चमकत्या डोळ्यात कारुण्य आणि स्नेह यांचा मिलाप ती पहात होती. तिला असं पुष्कळ वेळा वाटायचं की सरपटल्या मुंगीला देखील त्याला त्रास देता यायचा नाही !

अंगणात कुणाच्या तरी खोकण्याचा आवाज आला. ॲनानं कान देऊन ऐकलं. ओसरीवर मग पाय वाजले, तशी ॲना उठली आणि तिनं विचारलं, "कोण आहे ?"

"मी आहे——दार उघड."

"छोटा भाई का ?"

"हो."

तिनं दार उघडलं. ओसरीवर, चांदण्याच्या प्रकाशात खाली मान घातलेला रोक्कि तिला दिसला. ॲनानं विचारलं, "भाऊ, आत्ता इथं का आलास ? एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्यागत पोलीस इकडं फिरत आहेत." बोलता बोलता तिचा कंठ

दाटून आला. मग कसंतरी ती म्हणाली, "भाऊ, तू इथं थांबू नकोस. लवकर इथून जा."

"आणि तू इथं एकटी—" रोक्कीनं सुस्कारा सोडला.

"माझ्या सोबतीला देव आहे. तू जा——"

"तू आज काही खाल्लंस का ?"

"का, तुला काही पाहिजे ?"

"तांदूळ आहेत ?"

"हो. कांजी करू का ?"

"तांदूळ कुठून मिळाले ?"

"त्यानं आणले."

"कुणी ?"

"ते——ते"

"हवा ?"

"हो."

रोक्कि गप्प बसला. मग अॅना त्याला निश्चयी स्वरात म्हणाली, "भाऊ, तू जा. इथं थांबू नकोस—"

"इथं पोलीस आले होते ?"

"आले नाहीत. पण येतील आणि जेव्हा ते येतील तेव्हा—भाऊ, तू थांबू नकोस. चटकन जा." आणि ती एकदम रडू लागली.

रस्त्यावर बुटांचा आवाज आला. अॅना घाबरून म्हणाली, "अगं आई ग ! ते आले. तू लवकर जा इथून."

रोक्कि अंगणात उतरून पळणार तेवढ्यात तो दुबळा अंगणात येऊन पोहोचला. त्यानं रोक्कीला विचारलं, "कोण, रोक्कि ?"

"हो."

तो रोक्कीच्या जवळ गेला आणि त्याचा हात धरला. आणि मग अॅनाला तो हुकमी स्वरात म्हणाला, "आत जा आणि दार लावून घे."

"चल—" रोक्कीचा हात धरून त्याला ओढत तो रोक्कीला म्हणाला. ते दोघे पायऱ्यांवरून उतरले आणि रस्त्यावरून चालता चालता दृष्टिआड झाले.

एक सुस्कारा सोडून अॅना झोपडीत शिरली. तिनं दार लावलं आणि

चटईवर आडवी झाली. त्या दुबळ्याला समजावून घेण्याचा ती प्रयत्न करीत होती.

तो कसा माणूस आहे. त्याच्या प्रत्येक शब्दाला आणि कृतीला एक विशिष्ट अर्थ आहे, उद्देश आहे. कधीकधी त्याच्या चमचमणाऱ्या डोळ्यातून अग्निकण निघतात तर कधीकधी करुणेची आणि प्रेमाची आर्द्रता व्यक्त होते. तो जवळ येतो तेव्हा एखाद्या गरीब शेळीसारखा वाटतो. पण दूर गेला की तो सिंहाचं रूप धारण करतो.

'काय तो जिवावर उठलाय् ?'

'असेल तर........'

त्याच्या डोळ्यात स्नेहाचा ओलावा का असतो ? बाबा गेले आणि दोन्ही भाऊ तुरुंगात गेले तेव्हा तो तिला आणि तिच्या आईला उदरनिर्वाहापुरते पैसे का देत होता ? आईच्या शोधासाठी तिच्याबरोबर मध्यरात्री देखील येण्याचे कष्ट त्यानं का बरं घेतले असतील ? घराला आग लागली तेव्हा चार पात्र माणसांबरोबर तो एकटाच का झगडत राहिला ? त्याच्या दीन स्थितीत तो त्यांना तांदूळ आणि भाजी का विकत आणून देत होता ?

"हा माणूस का आपल्या जिवावर उठलाय् ?' तिनं स्वतःलाच तो प्रश्न विचारला.

खोल खोल हृदयात कुठं तरी हुरहुरल्यासारखं झालं. ही हुरहूर कसली आहे हे तिला कळलं नाही. पण ती हुरहूर सुखद होती यात शंका नाही.

ॲनाला वाटलं तो परत येईल. ती उठली आणि तिनं दार उघडलं आणि अंगणात येऊन उभी राहिली.

तेवढ्यात दूर धूळ उडाली. ॲनाच्या मनात पुन्हा ती सुखद हुरहूर झंकारली. तिचं सारं शरीर रोमांचित झालं.

"तू आत नाही गेलीस ?"

तो दुबळा जवळ आला. आणि त्यानं पुन्हा विचारलं, "आत का नाही गेलीस ?"

"गेले होते. दार सुद्धा लावलं होतं." तिनं हळूच सांगितलं.

"मग पुढं ?"

"मग असं वाटलं की बाहेर जावं." तिनं मान खाली घातली

स्तब्धता

"ॲना !"

"हं."

पुन्हा दीर्घकाळ शांतता.

"आत जा आणि दार बंद कर."

"हं."

तो पायऱ्यावरून उतरला आणि चालू लागला. ॲनानं आत जाऊन दार लावून घेतलं.

# [२०]

दमन आणि शोषणामुळं जनतेचा जो एक भाग गुलाम झाला होता. तो आता जागा होत होता. उठण्याचा प्रयत्न करीत होता.

गुलामगिरीच्या बेड्या तोडण्याचा जेव्हा प्रयत्न होतो तेव्हा हातापायांना जखम होण्याची शक्यता असते. ते अपरिहार्य असतं. त्यावेळी विचार आणि फेरविचार करायला वेळ नसतो. त्या जागृतीच्या विरुद्ध जाणाऱ्या सर्वांचा नायनाट केला जातो, आणि तीच जागृतीची खूण असते.

त्यादिवशी रोजच्या प्रमाणंच कामगारांची प्रयत्नशक्ती आजूबाजूच्या भागातून झरे आणि नद्या होऊन शहराच्या दिशेनं वाहात होती. जे झरे पूर्वी स्तब्धतेनं किंवा गुणगुणत वाहात होते ते आता गर्जना करीत चालले होते. संतप्त प्रतिज्ञा, रागानं केलेली विकट हास्यं, स्वातंत्र्यासंबंधीचे वादविवाद—हे सगळं घेऊन वाहात जाणारा तो महाप्रवाह संताप, राग आणि प्रतिज्ञा आत्मसात करून कारखान्यात शिरून भागात पसरला होता. मालक रागावलेले होते आणि सेवक भयभीत झालेले.

दिवसभर ॲना अस्वस्थ होती. ती वाट पाहात होती कारण तिला असं वाटत होतं की अंधार झाल्यावर तो दुबळा किंवा आपला भाऊ कोणीतरी येईल आणि सगळी बातमी कळेल.

वेलायुधनच्या आईनं येऊन विचारलं, तू अशी किती वेळ बसून राहणार?"

"मग मी काय करू ?"

"तांदूळ आहेत ना ?"

"हं."

"तर मग कांजी करून पी."

ॲना कांजी करून प्यायली. संध्याकाळी वेलायुधनची आई परत आली. ती तिला म्हणाली,

"मुली, तू इथं एकटी झोपू नकोस. माझ्याकडं चल. नाहीतर मी येते."

"माझ्या सोबतीला देव आहे."

"असं म्हणत राहिलीस तर——"

"तर काय ?"

"कुणी घरात घुसलं म्हणजे ?"

"घुसलं तर ?"

"तुला सक्तीनं पकडून नेलं तर ?"

"मला का पकडतील ? मी काय कुणाला मारलंय का कुणाचे पैसे चोरलेत?"

"तरुण मुलींना अशाकरता पकडतात की——"

ॲनाच्या चेहऱ्यावर गांभीर्य पसरलं. ती निश्चयी स्वरात म्हणाली, "कुणी पकडायला आलं तर आपण कुणाला पकडून आहोत हे त्याला कळेलच !"

त्यावर वेलायुधनची आई काहीच बोलली नाही. कणिचकोलंगरेच्या देवीला साकडं घालीत ती निघून गेली.

रात्र झाली. दहा वाजून गेले. दार घट्ट लावून ॲना आत पडली होती. पण तिला झोप लागली नव्हती.

अंगणात कुणाची तरी चाहूल लागली. ॲनानं कान टवकारले. मग तिच्या लक्षात आलं की अंगणात एकापेक्षा अधिक माणसं हिंडताहेत. ती उठली. दाराशी जाऊन लक्षपूर्वक पाहिलं.

काही माणसं घराच्या चारी बाजूंनी हिंडत होती. तिला काहीतरी विचारायचं होतं. पण तोंडातून शब्द उमटला नाही.

"ए, आत कोण आहे ?" एक अपरिचित करडा आवाज आला.

"कोण आहे ?" अखेर ॲनानं धीर करून विचारलं.

"दार उघडा !" पुन्हा हुकूम.

ॲनानं आगकाडीनं दिवा लावला. आणि हातात दिवा घेऊन तिनं दार उघडलं आणि ओसरीवर आली. आणि समोर दिसलेलं दृश्य पाहताच चकित झाली. यमदूतांप्रमाणे चार पोलीस अंगणात उभे होते. मग त्यातला एक ओसरी-वर शिरला आणि ॲनाच्या हातातला दिवा ओढून घेऊन आत गेला. आतल्या खोलीत शोधाशोध केल्यावर तो बाहेर आला आणि गंभीरपणे ॲनाला त्यानं विचारलं, "रोक्कि कुठाय ?"

"छोटा भाऊ इथं नाही—इथं आलासुद्धा नाही." तिनं धिटाई दाखविली.

"मी तुला विचारतोय की तो कुठाय् ?" पोलिसानं आवाज चढवला

"मला कसं ते माहीत असणार ?"

"काय तुला माहीत नाही ?" त्याच्या चेहऱ्यावर क्रौर्य पसरलं.

"मला नाही माहीत !"

"खरं बोललेलं बरं असतं."

"मी खरंच सांगतोय् !"

अंगणातले उरलेले पोलीस ओसरीवर आले. त्यापैकी एकजण म्हणाला, "झकास पोरगी आहे. तिला भिववू नका......बरं, तुझं नाव काय ?"

"ॲना."

"फार छान नाव" त्यानं ॲनाच्या खांद्यावर हात ठेवण्याचा प्रयत्न केला. तशी ॲना एकदम मागं सरली.

"मी इथं आहे." कुणाचा तरी रस्त्यावरून आवाज आला.

"कोण आहे ?" एका पोलिसानं विचारलं.

"मी रोक्कि"

"पकडा—त्याला पकडा." पोलीस रस्त्याच्या दिशेनं धावू लागले.

"मला पकडू शकत असाल तर पकडा." रस्त्यावर उभा असलेला माणूस वायुवेगानं पळाला.

पोलीस त्याच्यामागं धावले.

"ओ मसीहा !" ॲनानं आकाशाकडं पाहून हात उंच केले. मग कितीतरी वेळ ती तशीच उभी होती. असाच जरावेळ गेला.

"हे काय चाललंय ॲना—" असं म्हणत रोक्कि उद्वेगानं पायऱ्या चढून गेला.

तो रोक्कि आहे यावर ॲनाचा विश्वासच बसला नाही. तो जवळ आला तरी तिनं विचारलं,

"कोण आहे ?"

"ताई, मी आहे."

"छोटा भाऊ ?"

"हं."

"तुला पोलिसांनी पकडलं ना ?"

"कोण पोलीस ? ते इथं आले होते ? मला पकडायला ?'

"म्हणजे ? तुला काहीच माहीत नाही ?"

"मला कसं कळणार ? मी तर आत्ता आलो."

"मग रस्त्यावरून कोण म्हणालं की मी इथं आहे म्हणून ?"

"आँ."

"मी इथं आहे असं म्हणत तू पळाल्याचं देखील मी ऐकलं.'

"तू स्वप्नात आहेस."

"मग असं ओरडत पळालं कोण ?"

"अगं वेडे, तुला तसा भास झाला असेल."

"भास झाला असेल तर मग पोलीस पाठीमागं का धावले ?"

"पोलीस इथं आले होते ?"

"रोक्कि कुठं आहे असं विचारीत पोलीस मला पकडायला लागले. तेव्हा रस्त्यावरून कुणीतरी ओरडून सांगितलं."

रोक्कि विचारात पडला. आणि मग म्हणाला, "मग तो नक्कीच 'हुवा' असेल."

"मलासुद्धा तसंच वाटतंय. पोलिसांना पळवून लावण्यासाठी त्यानं नक्कीच असं काहीतरी केलं असेल."

रस्त्यात दूरवर कुठूनतरी पावलांचा आवाज ऐकू आला. तशी ॲना घाबरून म्हणाली,

"आले आले. पोलीस आले. भाऊ, तू निघून जा—"

"मी कुठं जाऊ. त्यांना येऊन मला पकडून नेऊदे."

दुबळा पायऱ्या चढून अंगणात आला. ॲनानं सुस्कारा सोडला. तिनं

विचारलं, "थोड्या वेळापूर्वी रस्त्यातून आपण काही बोलला होता का ?"

"हो."

"पोलीस कुठं आहेत ?"

"त्यांना पळवून लावलं !"

मग त्यानं रोक्कीचा हात धरला. आणि त्याला विचारलं, "इथं येऊ नकोस म्हणून मी तुला सांगितलं होतं ना ?"

"माझ्या धाकट्या बहिणीसाठी---" रोक्कि गहिरल्या स्वरात म्हणाला.

"चल. तिच्यावर तर काही संकट आलं नाही ना." रोक्कीला घेऊन तो चालू लागला. रस्त्यावर गेल्यावर त्या दुबळ्यानं अॅनाला म्हटलं, "आत जाऊन दार लावून घे."

"ओ मसीहा" अॅनान आकाशाकडं पाहून हात उंच करीत म्हटलं.

## [२१]

पायाखालची माती सरकू लागली. संप सर्वत्र पसरला. भांडवलदार मालकांच्या किंवा पोलिसांच्या धमक्यांचा काहीएक उपयोग झाला नाही.

ते प्रवाहाविरुद्ध पोहणं होतं. जे असाध्य मानलं गेलं होतं ते साध्य झाल्यासारखं वाटू लागलं; इतकं की प्रवाहाची गतीच आता उलट होणार की काय असं वाटू लागलं. ज्यांना प्रवाहाबरोबर जाण्याची सवय होती ते विरुद्ध दिशेनं पोहणाऱ्यांना सहानुभूती दाखवित होते. अशा तऱ्हेनं कामगारांच्या संघटित शक्तीला अनौपचारिक का होईना मान्यता मिळाली.

साथी नीलकंठन कामगारांच्या संघटनेचा नेता बनला. नीलकंठन शिकलेला आणि उच्च कुळातला असल्यामुळं त्याच्या नेतृत्वाखालील संघटनेला नावं ठेवणं किंवा तिच्याबद्दल बेपर्वा राहणं भांडवलदारांना आणि त्यांच्या पित्त्यांना अवघड होऊन बसलं. आता तुरुंगात गेलेल्या कामगार बंधूंना जामीनावर सोडवणं, त्यांच्या वकिलाची व्यवस्था करणं ही कामं सुरू झाली.

आपले भाऊ परत यावेत म्हणून अॅना सारखी प्रार्थना करायची. तो दुबळा रोज यायचा आणि तिला तांदूळ नि पैसे देऊन जायचा. तो आला की त्याला बरच काही विचारावं असं अॅनाला वाटायचं. पण ती बोलूच शकायची नाही.

एकदा रात्री तो दुबळा अंगणात आला नि खोकून त्यानं आपलं आगमन दर्शवलं. दिवा घेऊन अॅना बाहेर आली. त्यानं आणलेली टोपली ओसरीवर ठेवली. त्यात तांदूळ आणि सामान होतं. अॅनानं विलक्षण संकोचानं विचारलं, "असं किती दिवस चालणार ?"

"आजपर्यंत—"

"म्हणजे ?"

"उद्या ते येतील."

"ते येतील ?" अॅनानं आनंदानं विचारलं, "माझे दोन्ही भाऊ येतील?"

"हो. दोघंही येतील."

क्षणभर अॅनाच्या चेहऱ्यावर औत्सुक्य पसरलं आणि तिनं विचारलं, 'आणि त्यांना पुन्हा पकडलं तर—"

"पुन्हा पकडलं तर मी पुन्हा येईन."

"रोज असंच ?"

"असंच ?" त्यानं विचारलं, "आलं तर काय होतं ?"

"का पण, तुम्ही आमचे थोडेच आहात ?"

"का, मी अॅनाचा कुणीच नाही ?"

"हो." ती खाली मान घालून उत्तरली.

ताऱ्यांच्या प्रकाशात चार डोळे भेटले.

मौन---पण ते मौन बोलकं होतं. मग त्यानं विचारलं, "मी जाऊ ?"

"भाऊ उद्या केव्हा येतील ?"

"उद्या केव्हाही येतील."

"तुम्ही त्यांच्यावरोबर येणार ?"

"कोण मी ?"

"हो."

"नाही येणार."

"मग नंतर तरी ?"

"नाही."

मग शांतता. त्या शांततेचा भंग करीत त्यानं विचारलं, "ॲना मी जाऊ ?"

पण त्याला उत्तर मिळालं नाही.

तो निघाला. पायऱ्या उतरताना त्यानं मागं वळून पाहिलं. ॲना त्याच्याकडंच पहात होती. त्याला काहीतरी सांगायचं होतं पण तो काहीच बोलला नाही. रस्त्यावर उतरून चालू लागला.

तुरुंगांत ठेवलेल्या सर्वांना जामीनावर मुक्त करण्यात आलं. रोक्कीनं पण जामीन दिला. संध्याकाळी सगळेजण आपापल्या घरी आले.

भात आणि काही पदार्थ तयार करून ॲना भावांची वाट पाहात होती. भाऊ आलेले पाहिल्यावर ती ओक्साबोक्शी रडायला लागली. रोक्किपण रडला. अंतोणि मात्र निश्चलपणे उभा होता.

ॲनानं भात वाढला. तेव्हा अंतोणीनं विचारलं, "हे तांदूळ कुठले ?"

"हे ना——हे ना"

"'हवा' नं दिले होते ना ?" रोक्कीनं विचारलं.

"हो."

"तू इतके दिवस कसे काढलेस ?" अंतोणीन विचारलं.

"ते आणून देत होते म्हणून काढले."

"मग आता तो कुठं गेला ?"

"काल रात्री तांदूळ आणि थोडं सामान दिलं आणि तो म्हणाला की उद्या दोघं भाऊ येतील आणि निघून गेला."

त्यावर अतोणीनं काही एक विचारलं नाही. जेवण झाल्यावर रोक्कि ओसरीवर चटई पसरून झोपला. ॲनानं दार लावून घेतलं आणि अंतोणि अंगणात येरझारा घालू लागला.

मत्तायि आणि सैमन संध्याकाळ झाल्यावर आपल्या घरी पोहोचले. पाहतात तो काय, दार बंद केलेलं होतं. ओसरी स्वच्छ झाडलेली होती. मत्तायीनं विचारलं, "अंगण ओसरी झाडली कुणी ?"

"वेलायुधनची आई किंवा ॲना !"

मत्तायीनं दरवाजाला बांधलेली दोरी सोडली. खोलीत त्यांची मातीची भांडी, माठ, वडिलांची खाट, चटई सगळ्या गोष्टी होत्या. पण अंधारामुळं काहीच

दिसत नव्हतं.

ज्याठिकाणी त्यांच्या वडिलांचे निष्प्राण शरीर ठेवलं गेलं होतं. तिथं त्या दोघांनी माथं टेकवलं. त्यांच्या डोळ्यातून अश्रूधारा वाहात होत्या. त्यांनी क्रॉसचं चिन्ह हातात धरलं. आणि आपल्या वडिलांना परलोकात शांती मिळावी म्हणून प्रार्थना केली.

ते उठले. त्यांनी आपले डोळे पुसले. मग मोठा छोट्याला म्हणाला, "तू शेजारी जा आणि नारळाच्या झावळ्यांची मशाल पेटवून आण."

"पण काड्यापेटी आणि दिवा आत आहे." अंगणातल्या अंधारातून दुबळ्याचा आवाज आला.

"कोण आहे ?" दोन्ही भावांनी एकदम विचारलं.

"मी आहे."

"हवा ?" मत्तायीनं विचारलं.

"हो".

"रोज येत होतात का ?"

"हो."

मत्तायि खोलीत गेला. मग 'हवा'नं त्याला हाक मारून सांगितलं, "काड्यापेटी आणि दिवा खाटेवर आहे आणि तिथंच एका टोपलीत तांदूळ आणि इतर सामान पण आहे."

आत आगकाडी पेटवली गेली. प्रकाश पसरला. मत्तायि दिवा घेऊन बाहेर आला आणि अंगणात पाहून त्यानं विचारलं, "कुठं आहात ?"

"पुन्हा येईन" हवानं रस्त्यावरून उत्तर दिलं.

# [२२]

काही लोक असे असतात की ते युद्धाच्या मैदानावर भयानक गर्जना करतात आणि एकांतात ओक्साबोक्शी रडतात. काही लोक असे असतात की त्यांच्या छातीत सुरी भोसकून ते रक्तबंबाळ झाले तरी निश्चल असतात. परंतु दुसऱ्याचं दु:ख कमी करण्यासाठी ते आपला प्राण द्यायलाही तयार असतात. किती विपरीत आहे हे सगळं ! असं म्हणतात की स्नेह आणि द्वेष या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. कदाचित हे बरोबर असेलही. किंवा स्नेह आणि द्वेष यांची विभागणी करणं अशक्य असेल. या दोन्हीच्या सीमारेषा आखण्यात आजपर्यंत कुणी यशस्वी झालेलं नाही.

काही लोकांचं प्रेम अंतर्मुख असतं. त्यांचा स्नेह व्यक्तीच्या संकुचित परि-घात सामावला जातो. ज्या ज्या गोष्टी आपल्या वैयक्तिक सुखाच्या आड येतील त्यांचा ते द्वेष करतात. मग अशा गोष्टी नष्ट करण्यासाठी त्या व्यक्ती कोणताही धोका पत्करायला किंवा एखादा अन्याय करायला देखील तयार होतात.

काही लोक असे असतात की त्यांच्या स्नेहाच्या सीमा विस्तृत असतात. ज्या ज्या ठिकाणी स्नेहाकांक्षी आणि खरे प्रेमी असतात. तिथं त्यांचाही स्नेह आणि प्रेम पसरत जातं. कष्ट करणाऱ्यांचे कष्ट कमी करणं आणि दु:खितांना धीर देणं हेच त्यांच्या प्रेमाचं लक्ष्य असतं. त्यामुळंच कष्ट आणि त्रास देणाऱ्यांचा ते द्वेष करतात. हा द्वेष कधी कधी हिंसा आणि अत्याचार यांनाही उत्तेजन देतो.

चांगुलपणा आणि वाईटपणा यापलीकडे जाऊन केवळ माणुसकी पाहणारी माणसं फारच थोडी. प्रत्येक माणसात ते चांगुलपणा किंवा वाईटपणा पाहतात आणि प्रत्येक माणसाचा आणि समाजाचा चांगुलपणा वाढवण्याचा आणि वाईट-पणा कमी करण्याचा प्रयत्न करीत असतात. पण त्यासाठी कुठला धोका पत्करायला किंवा अन्याय करायला ते तयार नसतात. हा, वाईटपणा नाहीसा करण्याच्या प्रयत्नात ते स्वत: आत्मार्पण करायलाही सिद्ध असतात.

यापैकी शेवटच्या श्रेणीतला माणूस होता अंतोणि. रोविक दुसऱ्या वर्गातला होता. रोवकीनं मिस्त्रीच्या घरात जाऊन त्याला मारहाण केली आणि छोटया

मालकाला दगड मारून पाडलं हे अंतोणीला मान्य नव्हतं. त्याचप्रमाणं तो दुबळा माणूस कामगारात वाऱ्याप्रमाणं घुसून क्रांती करण्याची प्रेरणा देत होता, ॲनाला रोज एकांतात भेटून तांदूळ आणि पैसे देत होता हे सुद्धा अंतोणीला फारसं आवडलं नाही. अंगणात येरझारा घालता घालता तो म्हणाला,

"हे वागणं बरोबर नाही. असंच व्हायला लागलं तर——"

"दादा, तू काही म्हणालास ?" चटईवर उठून बसत रोक्कीनं विचारलं.

"मी म्हणतोय हे वागणं बरं नाही."

"कसलं वागणं ?"

"घरी बसलेल्या माणसाला मारायचं आणि रस्त्यावरून जाणाऱ्यावर दगड फेकायचे !"

"मग घराला आग लावणं चांगुलपणाचं लक्षण आहे कां ? आम्हाला पोलिसाकरवी पकडून नेणं बरोबर आहे का ?" रोक्कि उठून सरळ अंगणात आला.

"तू असं विचारायला लागलास तर........"

"मग कसं विचारू ?"

"घराला आग लावण्याचा सूड म्हणून मिस्त्रीला मारलं तर काय आग विझेल ?"

"आणि घराला आग लावलेली पाहून हाताची घडी घालून बसलो तर आग विझेल का ?"

"उगीच काहीतरीच बोलू नकोस रोक्कि."

"मग तू तरी काय म्हणतो आहेस ?"

दार उघडून ॲना बाहेर आली आणि तिनं रोक्कीला विचारलं, "धाकट्या भावानं मिस्त्रीला मारलं तेव्हाच पोलिसांनी मोठ्या भावाला पकडून नेलं ना ?"

"ते.....ते....." रोक्कीला उत्तर सुचलं नाही. त्याचा चेहरा उतरला.

मग अंतोणि ॲनाच्या अंगावर ओरडला, "तू गप बस पाहू. आम्ही बोलतोय. तू आमच्यामधे लुडबूड करू नकोस. जाऊन मुकाट्यानं झोप पाहू."

"मला एवढंच विचारायचं होतं."

ॲनानं आत जाऊन दार लावलं. मग अंतोणीनं रोक्कीला विचारलं, "छोट्या मालकांना दगडानं कुणी मारलं ?"

"त्याला ना..... त्याला ना....."

"मी विचारतोय तू मारलंस का ?'

"नाही."

"मग कुणी ?"

" 'हवा' नं ! आणि त्याच्याबरोबर पुष्कळ लोक होते."

"तो मरायला आणि मारायला आलेला आहे."

"पण तो नसता तर——"

"नसता तर काय ?"

"आमच्या बहिणीला पोलिसांनी .....

"बोल. बोल——पूर्ण कर."

"तिलाच बोलवून विचार ना——"

"ॲना, इकडं ये."

ॲना दार उघडून बाहेर आली. अंतोणीनं विचारलं. "काय ग, पोलीस इथं आले होते का ?"

"हो."

"दिवसा का रात्री ?'

"रात्री."

"मग ?"

"मग एक पोलीस मला पकडायला लागला

"मग पकडलं का ?"

"तो मला पकडू शकला नाही. रोक्कि कुठं गेला असं एक पोलीस मला विचारत होता. मी त्याला जेव्हा सांगितलं की तो इथं नाही तेव्हा पोलीस मला पकडायला लागला. इतक्यात रस्त्यावरून कुणीतरी पोलिसांना म्हटलं की मी इकडं आहे. असं सांगून तो एकदम पळायला लागला. पोलीस त्याच्यामागं धावायला लागले.

"पण पळाला तो कोण, हवा ?'

"हो."

"बरं. तू जाऊन झोप आता."

ॲनानं आत जाऊन दार बंद केलं. अंतोणि फेऱ्या मारू लागला. मध्यरात्र

झाली होती. शेजारपाजारचे सर्व लोक झोपले होते. केवळ रोक्कीचं घोरणंच त्या शांततेचा भंग करीत होतं.

तेवढ्यात झोपडीचं दार उघडलं. अ‍ॅना बाहेर आली आणि अंतोणीच्या जवळ जाऊन तिनं विचारलं, "दादा, तू झोपत का नाहीस ?"

अंतोणि हाताची घडी घालून उभा होता. अ‍ॅनाच्या चेहऱ्याकडं पहात त्यानं विचारलं, "काय तो रोज येत होता ?"

"कोण हवा ?"

"हो."

"काल रात्री एका टोपलीत तांदूळ आणि थोडं सामान ठेवून गेले त्यानंतर अजून काही दिसले नाहीत."

"तुझ्याजवळ तो गप्पा करायचा ?"

"कधी कधी मी काही विचारलं तर तेवढ्यापुरतं उत्तर द्यायचे—नाहीतर तांदूळ आणि पैसे ठेवून निघून जायचे."

यावर अंतोणि काहीच बोलला नाही मग अ‍ॅनानंच विचारलं, "दादा, तू त्यांच्याबद्दल का विचारलंस ? ते........"

"सहजच विचारलं. जा तू जाऊन झोप."

अ‍ॅना आत गेली.

अंतोणि परत येरझारा घालू लागला.

# [२३]

चळवळ थंडावली. परंतु ती शांतता म्हणजे अधिक वेगवान आणि दीर्घ आंदोलनाची पूर्वतयारी करण्याबद्दलची सूचना होती.

मजुरांची संघटना एखाद्या पोलादी किल्ल्याप्रमाणे बळिष्ठ होऊ लागली होती. कारखानारूपी शत्रूकेंद्रात आक्रमणासाठी सेना सिद्ध केली होती. कामगारांना प्रतिकूल असणारा प्रत्येक शब्द, दृष्टी आणि टाकली जाणारी पावलं याबद्दल साव-

धानता बाळगली जात होती. भांडवलदार आणि शासक लढाईच्या जागेवरून मागे हटले होते आणि स्वतःच्या संरक्षणाची तरतूद करण्यात मग्न होते.

कामगारांच्या संघर्षाचा उद्देश आणि मागण्या यात मूलभूत बदल होऊ लागला होता. त्यांच्या पहिल्या मागण्या अशा होत्या की त्यांची मजुरी कमी होता कामा नये, मालकाच्या इच्छेनुसार कुणाला नोकरीतून काढून टाकता कामा नये आणि कारखान्यातल्या स्त्रिया सुरक्षित राहिल्या पाहिजेत.

आता त्यांच्या मागण्या बदलल्या होत्या. त्यांची पहिली मागणी अशी होती की पगारात वाढ झाली पाहिजे, अधिक नोकऱ्या उपलब्ध झाल्या पाहिजेत, नोकरीत स्थैर्य असलं पाहिजे. आणि प्रत्येकाला न्याय्य वागणूक मिळाली पाहिजे. त्यांच्या मागण्या आणि उद्देशाशिवाय कामगारवर्गाचा आणखी एक उद्देश पण होता. त्यांचं खरं उद्दिष्ट असं होतं की सामाजिक रचनाच बदलायची ! या नव्या समाज व्यवस्थेत रंक आणि राव इत्यादि भेदाभेद असणार नाहीत. शोषण असणार नाही आणि तो समाज समता आणि समृद्धि यावर आधारित असेल. पगार वाढवणं, काम मिळणं या चळवळी अंतिम उद्दिष्ट साध्य करण्याच्या मार्गातील काही भाग होते.

अंतोणि, मत्तायि, पद्मनाभन, अच्युतन, जोसेफ हे सगळे कामगारांचे नेते बनले आणि कामगार संघटनेचे बलिष्ठ कार्यकर्तेही झाले.

जाहीर सभा, चर्चासत्र, गुप्त सभा ! भाषण, भाषण, भाषण ! गुलामी आणि संकट अतिरिक्त झाल्यामुळं किंवा कुठल्या तरी मंत्रशक्तीमुळं कामगार वर्ग उठून उभा राहिला होता. तो अंधारातून प्रकाशाकडं जाणारा प्रवाह होता, दारिद्र्याकडून समृद्धीकडं जाणारी ती एक मिरवणूक होती. शतकानुशतकानंतर जगाच्या इतिहासात एक नवीन अध्याय लिहीला जात होता. आलप्पुषा शहरातले कामगार या नव्या नाटकातले काही अभिनेते फक्त होते.

'हवा' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या त्या दुबळ्याचा शब्द मोठ्यानं येत होता. चहाच्या दुकानात, चौकाचौकात, चर्चासत्रात, गुप्तसभात सगळीकडं त्याचा शब्द घुमत होता. प्रत्येक कामगाराच्या कंठातून त्याचेच शब्द प्रतिध्वनित होत होते —

"नाहीसं व्हायला आमच्याजवळ काहीही नाही. पण मिळवायला मात्र सारं जग आहे."

पण एका कंठातून निघणारा शब्द मात्र—अंतोणीचा शब्द त्या 'हवा' च्या शब्दापेक्षा भिन्न होता. तो तर त्याचा स्वतःचा शब्द होता. दुःखानं भिजलेला, तोलून येणारा आणि हृदयापासून निघणारा. अंतर्मनातून येणाऱ्या ग्रामीण भाषेत तो मजुरांच्या हलाखीचं चित्र यथातथ्य रंगवायचा. आणि समोर समुद्रासारख्या पसरलेल्या कामगारांना तो विचारायचा—

"काय, आपण माणसं आहोत की नाही ? मी म्हणतो आहोत. मग जर आहोत तर ........." आणि मग वाक्य पुरं न करता तो विचारायचा, "झिजून झिजून, तिळातिळानं मरण्यापेक्षा आम्ही सर्वजण एकदम मरू—

सभेच्या एका कोपऱ्यात बसलेला रोक्कि मग कुजबुजायचा, "मरू कशासाठी ? मरण्यापेक्षा मारणं अधिक चांगलं !"

'हवा' च्या शब्दांची ही प्रतिक्रिया होती.

अंतोणीच घर आता गुप्त सभेचं केंद्र बनलं होतं. संध्याकाळपासून मध्यरात्रीपर्यंत त्याच्या झोपडीत दिवा दिसायचा आणि दबलेले आवाज ऐकू यायचे. मत्तायि, सैमन, पद्मनाभन, अच्युतन, शंकु, जोसेफ, अंतोणि आणि रोक्कि सर्वजण त्या गुप्त सभात भाग घ्यायचे. त्या दुबळ्याचा संथ शब्द तिथं घुमत होता.

त्यांना काळी कॉफी उकळून द्यायची, विडी आणि पान द्यायचं, दिव्यातलं रॉकेल संपलं तर परत भरायचं अशी निरनिराळी कामं ॲना करायची.

त्या गुप्त सभातून आता आणखी दोन तीन माणसं नव्यानं यायला लागली होती. ॲना त्यांना ओळखत नव्हती. पूर्वी कधी तिनं त्यांना पाहिलेलंही नव्हतं. त्यांचे कपडे मळके होते पण त्यांच्यावरून दृष्टिक्षेप टाकला की एक गोष्ट लक्षात यायची की ते कामगार नाहीत. त्यांच्यातला एक देखणा पुरूष त्या गुप्त सभेत बोलायलाही लागला. तो आपल्या सभ्य, स्पष्ट आणि शुध्द भाषेत कामगारांचं अंतिम लक्ष्य काय आहे हे सांगायचा. तो कार्ल मार्क्स, लेनिन आणि रशियन क्रांतीबद्दल मोठमोठी भाषणं द्यायचा.

तो हसऱ्या चेहऱ्याचा तरुण सगळं सांगायचा. रशियात लेनिननं कशी क्रांती केली. भांडवलदारांविरुध्दच्या अंतिम लढ्यात त्यानं कामगारांची शक्ती कशी एकत्रित केली आणि पगार वाढवणं व काम मिळवणं यासाठी निर्माण झालेल्या चळवळीला राष्ट्रीय क्रांतीचं स्वरूप कसं प्राप्त करून दिलं हे सगळं

तो सांगायचा. त्याचा एक एक शब्द, त्याची दृष्टी, त्याचं स्पंदन--सगळ्यात जणू अग्निज्वाला भडकलेली होती. तो नाटकी ढंगात म्हणायचा, "आम्हाला मारावं लागेल, रक्त वहावं लागेल, रक्ताच्या नद्यांत आपल्याला बुडी मारावी लागेल—समता आणि बंधुत्व स्थापित करण्यासाठी, हे सगळं आपल्याला करावं लागेल."

"पण कसं?" अंतोणीनं नकळत विचारलं आणि मग तो एकदम बोलू लागला. "मारण्यात प्रेम कसलं आलंय?"

"जीव घेऊन समता कशी प्रस्थापित होणार?"

रोक्कीनं मध्येच विचारलं.

"ती कशी, यांचं उत्तर आहे. ते असं की जे प्रेम करीत नाहीत त्यांना मारावं असं ते म्हणत आहेत."

"मारल्यावर मग?"

"मारल्यावर मग आपलं राज्य सुरू."

"मी असं विचारतोय की त्यांना न मारता, रक्तपात न करता हे शक्य नाही का?"

"शक्य नाही. कारण.........पद्मनाभन उतरला. तशी ते सहन न होऊन रोक्कि म्हणाला, "आमच्या दादाचं असं म्हणणं आहे की फणी उभारून जर साप चावायला आला तर त्याला कुरवाळावं, गोंजारावं."

अंतोणि काहीच बोलला नाही.

# [२४]

ॲना संतुष्ट होती. पूर्णपणे. तिचे दोन्ही भाऊ तुरुंगात किंवा एखाद्या गुप्त ठिकाणी नव्हते. ते रोज घरी येत होते. घराचा खर्च चालवत होते. आणि घरीच रात्री झोपत होते. त्यामुळं ती संतुष्ट होती. अर्थात तिच्या खुषीचं सर्वात मोठं कारण की ती आता त्या घरात निर्भयपणे राहू शकत होती.

ती रोज मरियमच्या चित्रासमोर बसून आपल्या आईवडिलांना चिरशांती लाभावी म्हणून प्रार्थना करायची. ती देवीला अशी प्रार्थना करायची की तिनं तिच्या दोन्ही भावांना संकटातही सुरक्षित ठेवावं.

अंतोणि आणि रोक्कि काय करतात इकडं मात्र तिचं लक्ष नसायचं. आणि त्यात तिला गम्य नव्हतं. तिनं त्यांच्यावर प्रेम करावं आणि त्यांनी तिच्यावर प्रेम करावं एवढीच तिची अपेक्षा होती. घडून गेलेल्या घटनांची आठवण काढून ती प्रार्थना करायची, "हे गुणवती मरियम, माझ्या भावांना संकटातून वाचव."

रात्री गुप्त सभा झाल्यावर अंतोणि आणि रोक्कि भोजन करीत. त्यांचं झाल्यावरच ती थोडंसं खायची. अंतोणि आणि रोक्कि ओसरीवर टाकलेल्या चटईवर झोपायचे. ती आत झोपायची. कधीकधी दारामागं लपून ती गुप्त सभेतली भाषणं ऐकायची. तिला काही समजायचं नाही. पण तरीही, ज्यानं तिला आणि तिच्या आईला पैसे दिले होते, सामान आणून दिलं होतं, एकटेपणापासून तिला वाचवलं होतं आणि पोलिसी अत्याचारापासून तिची अब्रू राखली होती. त्या दुबळ्याचं भाषण ती लक्षपूर्वक ऐकायची. ती स्तब्ध बसून त्याच्या मुखातून येणाऱ्या अखंड शब्दधारेतल्या शब्दांचा अर्थ समजण्याचा प्रयत्न करायची. पण तिला काही समजायचं नाही. दुसऱ्या कुठल्यातरी भाषेत तो बोलतोय असं तिला वाटायचं. तरीदेखील त्याच्याकडं पाहात ती बसून रहायची. त्याचं भाषण ऐकण्यात तिला एक आनंद मिळायचा.

एका रात्री ॲना स्वयंपाकघरात काळी कॉफी करीत होती. बाहेर तो देखणा तरुण बोलत होता. शेवटी त्यानं आपला मंत्र पुन्हा एकदा ऐकवला—

"मारायला पाहिजे. रक्त वाहिलं पाहिजे. रक्ताच्या नदीत बुडी घेतली पाहिजे !"

ॲनाला आश्चर्य वाटलं. ती पहिल्यांदाच असलं बोलणं ऐकत होती. मग ती तिथून उठली. दारामागं लपून तिनं त्या क्रांतीकारक युवकाच्या चेहऱ्याकडं पाहिलं—त्याच्या डोळ्यातून अग्निज्वाला बरसत होत्या. मग तिनं त्या दुबळ्याकडं पाहिलं— तो डोळे मिटून विचारात गढलेला होता. मग तिनं रोक्कीकडं पाहिलं—तो मोठ्या डोळ्यांनी पहात दात ओठ खात बसला होता. ती घाबरली. सर्वांच्या चेहऱ्यावर क्रौर्य व्यक्त होत होतं. अंतोणि मात्र खाली मान घालून जमीनीवर बोटानं काहीतरी लिहीत होता.

थोडा वेळ सभेत स्तब्धता पसरली. मग अंतोणीनं मान वर करून एकदम विचारलं,

"कुणाला मारायचं ?"

"कुणाला मारायचं असं नाही—" पद्मनाभन उत्तरला, "सांगण्याचा हेतू एवढाच की वेळ आली तर, गरज पडली तर मारलं पाहिजे—"

"पण गरज कशाला पडती आहे ?"

"गरज ?.........काही वेळा अशा असतात की मारल्याशिवाय काम होत नाही. त्यावेळी मारायला सुद्धा कमी करता कामा नये."

"मी विचारतोय की का मारायचं ?"

"का, इतक्या वेळ चाललेली चर्चा ऐकली नाहीस ?"

"हो ऐकली. म्हणून तर विचारतोय की मारायचं कुणाला शेवटी ?"

रोक्कीला ते सहन झालं नाही. तो एकदम उठला आणि अंतोणीकडं अंगुली-निर्देश करून गरजला, "असा प्रश्न विचारणाऱ्यालाच पहिल्यांदा मारलं पाहिजे."

सभा स्तब्ध झाली. दारामागं लपलेली ॲना बाहेर आली आणि भूतबाधा झाल्यासारखी थरथरत तिनं रोक्कीला विचारलं, "कुणाला ? कुणाला मारायला पाहिजे ? बोल. भाऊ कुणाला मारायला पाहिजे ?"

रोक्कीनं खाली मान घातली. अंतोणि उठून ॲनाजवळ गेला आणि शांत पण प्रेमळ स्वरात तिला म्हणाला, "मुली, तू आत जा. तो उगीच चेष्टा करतोय !"

ॲनाचे डोळे डबडबले. मग तिनं गहिवरल्या स्वरात विचारलं, "काय, मारायला आणि मरायला तुम्ही इथं जमता काय ?"

"तू इकडं का आलीस ?" अंतोणि ओरडला. "तुला कुणी इथं बोलवलं होतं ? तू आत जा."

ॲना स्वयंपाकघरांत गेली. सभा अगदी शांत होती. रोक्कि डोकं धरून बसला होता.

दुवळा शांतपणे उठला आणि म्हणाला, "मित्रांनो, आपण जाऊ या. यापुढं इथं सभा होणार नाही."

तो गेला. बाकोचे त्याच्या पाठोपाठ. अंतोणि हाताची घडी घालून अंगणात येरझारा घालू लागला.

मध्यरात्र झाली. रोक्कि ओसरीवर गाढ झोपला होता. अंतोणि अजून

फेऱ्या मारीत होता. रॉकेलचा दिवा घेऊन ॲना अंगणात आली आणि संथपणे अंतोणीच्या जवळ गेली.

"दादा."

"हं ?"

"कांजी प्यायची आहे ना ?"

"तू घेतलीस ?"

"नाही."

"त्याला उठव आणि कांजी दे. तू पण पी."

"आणि तू ?"

"मला भूक नाही लागत——"

"का नाही भूक लागत ?"

"तू काही हे सगळं विचारू नकोस हं. त्याला बोलवून कांजी पाज आणि तू पण पी. बस् !"

"दादा, मी जे काही बोलले ते चुकीचं होतं का ?" ॲनाचा गळा दाटून आला. रडत रडत ती म्हणाली, "माझं चुकलं असेल तर मी पाय धरून क्षमा मागायला तयार आहे."

अंतोणीनं तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलं, "तू काही चुकीचं बोलली नाहीस, जे बोलायला हवं होतं तेच बोललीस !"

"चुकीचं बोललो तो मी." असं म्हणत रोक्कि अंगणात आला. अंतोणीच्या समोर गुडघे टेकून तो गहिवरल्या स्वरात म्हणाला—

"माझ्या भावाला मारलं पाहिजे असं मीच म्हणालो होतो. चूक माझीच आहे. दादा मला क्षमा कर."

"उठ. उठ". अंतोणीचा कंठ दाटून आला.

आकाशाकडं पहात ॲना म्हणाली, ओ मसीहा !"

# [२५]

केरळमधील कोल्लवर्षम गाव. १९३८ साल. सप्टेंबर महिना. दुसऱ्या महायुद्धाचे काळे ढग आकाशात पसरत होते. स्वातंत्र्य चळवळीच्या भट्टीत भारत भाजून निघत होता. भारतात सर्वत्र ही चळवळ पसरलेली होती. तिरुवितांकुर (त्रावणकोर) मध्येही एखाद्या वादळाप्रमाणं हे आंदोलन पोहोचलं होतं. त्या वादळाचं केंद्र होतं आलप्पुषा शहर. तिथल्या चळवळीचं नेतृत्त्व कामगारांकडं होतं.

—त्यादिवशी तिरुवितांकुरच्या महाराजांचा वाढदिवस होता. तो दिवस तिरुवितांकुर राज्यात मोठ्या उत्सवाचा आणि सणाचा मानला जात असे. जणू एक पुण्यपर्वच. त्यादिवशी झोपडीपासून राजवाड्यापर्यंत आणि विद्यालयापासून देवालयापर्यंत महाराजांची स्तुतिगीतं गायिली जात. पण त्यावर्षी महाराजांचा वाढदिवस पुण्यपर्व मानला गेला नाही. आणि त्यांची स्तुतिस्तोत्रही गायिली गेली नाहीत. उलट तो दिवस जनतेनं शोक दिवस मानला.

राजाचे प्रतिनिधी म्हणून राज्य करणाऱ्या दिवाणाविरुद्ध सूड म्हणून त्या दिवशी कामगारांनी सार्वत्रिक हरताळाची घोषणा केली होती. त्या दिवशी कारखान्यांच्या चिमण्यातून धूर बरसला नाही. शहराच्या आजूबाजूनं जो जनप्रवाह शहराच्या दिशेनं वहात आला तो प्रयत्नशक्तीचं नव्हे संहारशक्तीचं प्रतिनिधित्व करीत होता. गल्लीबोळातून, रस्त्यावरून हात उंच करून आणि मुठी दाखवून लोकांनी राजा आणि सरकारविरुद्ध घोषणा दिल्या.

पण स्वातंत्र्याचा हा प्रवाह अडविण्यासाठी आणि त्याचा नायनाट करण्यासाठी शासकांनीही प्रतिकाराची यंत्रणा सज्ज केली होती. शस्त्रधारी सैनिकांनी भरलेल्या गाड्या शहरातून हिंडत होत्या. लाठीधारी पोलीस रस्त्यावरं पहाऱ्यासाठी उभे होते. पण बंदुकीचा आणि काठीचा निषेध करीत कामगार मुठी वळवून जातच होते.

तो दुबळा विजेप्रमाणे सर्वसंचारी झाला होता. एकदा दिसायचा पुन्हा अंधारात नाहीसा व्हायचा, पुन्हा दिसायचा पुन्हा नाहीसा व्हायचा. अशा रीतीने लपत प्रकट होत तो त्या वादळाला चैतन्य प्राप्त करून देत होता.

ओसरीवर बसून ॲना एकटीच रस्त्यावरची रहदारी पहात होती. तीन दिवस होऊन गेले पण तिच्या दोन्ही भावांचा पत्ता नव्हता. तीन दिवस ती उपाशी होती, ती झोपलीदेखील नव्हती. दिवा लावून ती रात्रभर भावांची वाट पहात बसून रहायची. खायला घरात होतं पण ती काहीही न खाता भावांची वाट पहात होती.

वेलायुधनची आई आणि इतर शेजाऱ्यांनी तिला पुष्कळ ऐकवलं होतं पण सरकारबद्दल तिला काहीच ज्ञात नसल्यानं त्यांच्या बोलण्याचा अर्थ तिला समजला नव्हता. आणि तिला तो समजून घ्यायचीही इच्छा नव्हती. आपले दोन्ही भाऊ घरी यावेत आणि त्यांच्यावर कोणतीही संकटे येऊ नयेत एवढीच तिची इच्छा होती.

तीन दिवशी आणि रात्रीही दिवा लावून ती आपल्या भावांची वाट पहात होती त्यावेळी तो दुबळा वरून डोकवायचा. तो दिसला की ती लगेच उठायची— पण तेवढ्यात तो कुठंतरी नाहीसा व्हायचा ! आदल्या रात्री तिनं जेव्हा त्याला पाहिलं तेव्हा तिनं त्याला विचारलं, "माझे भाऊ कुठायत् ?"

"येतील" एवढं त्यानं सांगितलं आणि तो नाहीसा झाला.

आणि सकाळी खरोखरच अंतोणि दाराच्या पायऱ्या चढून वर आला. ॲना आश्चर्यचकित झाली आणि तिनं त्याला विचारलं, "तुमची वाट पाहून डोळे जायची वेळ आली—दादा, धाकटा कुठाय् ?"

"काय तो अजून नाही आला ?"

"नाही."

"इथं तू रहा म्हणून मी त्याला सांगितलं होतं."

"मग तो का आला नाही ?"

अंतोणि विचारात पडला तशी ॲनानं विचारलं, "कसला विचार करतोस?"

"विचार ना.....विचार ना ?"

"दादा, तू इथं का आला नाहीस ?"

"एवढ्यासाठी आलो नाही की———"

"दादा, वाक्य पूर्ण कर ना ———"

"मी वाक्य अशाकरता पूर्ण करीत नाही की—" तो वळून परत जात म्हणाला, "मी आलोच."

"पाय तुटायची वेळ आली तरी आणखी कुठं जातोस आता ?"

"असू दे. मी जातो आणि अगदी लौकर परत येतो."

जणू स्वप्नात चालल्यासारखा चालत तो निघून गेला.

ॲनानं एक दीर्घ सुस्कारा सोडला. एवढ्यात कुणाचा तरी आवाज आला. ॲनानं लक्षपूर्वक ऐकलं.

"कोण आहे ते ?"

"मी आहे."

"रोक्कि, तू कुठं होतास ?"

"मी......मी ....मी ना ?"

"त्याची संगत चांगली नाही असं मी तुला सांगितलं होतं ना ?"

"का चांगली नाही ?"

"मारहाण करणं आपल्याला बरं दिसत नाही. तो मरायला आणि मारायला आलाय्—— त्याची संगत आपल्याला पटणारी नाही."

"माझं मी पाहून घेईन." रोक्कि गंभीरपणे म्हणाला आणि निघून गेला.

"भाऊ, तू असं का म्हणालास?" त्याच्यापाठोपाठ धावत जात ॲनानं विचारलं.

"तू घरी जा पाहू." अंतोणीनं तिला दटावलं.

अंतोणि खाली मान घालून निघून गेला. तर ताठ मानेनं रोक्कि विरूद्ध दिशेनं गेला. ॲनानं एक खोल श्वास घेतला आणि ती घरी गेली.

ॲना अंगणात उभी होती. अंतोणीशी फार धिटाईनं बोलताना तिनं रोक्किला अनेकदा पाहिलं होतं. त्या दुबळ्यापासून रोक्कीला फोडण्याचा प्रयत्न अंतोणी करतो आहे हे तिच्या लक्षात आलं होतं. पण त्या दुबळ्याला 'मारणारा' आणि जीवावर उठलेला असं का म्हटलं जातं हे मात्र तिला समजलं नाही. प्रत्यक्षात तो कष्ट करणारा आणि संरक्षण करणारा आहे असा तिचा अनुभव होता.

"ते आले ?"

आवाज ऐकून ॲनानं वळून पाहिलं तो दुबळा रस्त्यातून हाक मारून विचारत होता.

"हो आले" ॲना उत्तरली.

"मग ?" तो अंगणात आला.

"पण परत गेले—"

तो जरा वेळ गप्प उभा राहिला. मग ॲना म्हणाली, "सगळे असं म्हणतात की तुम्ही मारायला आणि मरायला चाललेले आहात."

"कोण ? मी ?"

"हो."

"हे तुला खरं वाटतं ?" बोलता बोलता तो जवळ आला.

"नाही."

"पण मला मारायला किंवा मरायला काही वाटत नाही हे खरंच आहे !"

त्याच्या त्या बोलण्यानं ॲनाच्या मनावर आघात झाला.

ॲना चकित झाली. पण म्हणाली, "खोटं आहे हे."

"पण—" तो जोरात म्हणाला, "मरणं आणि मारणंच केवळ नव्हे. तर मला प्रेम करायला पण येतं !"

त्यानं आपला हात पुढं केला.

ॲनानं त्याचा हात धरला तेव्हा तिचा हात थरथरत होता.

## [२६]

संध्याकाळ झाली. त्या दिवशी समुद्र रोजच्यापेक्षा अधिक मोठ्यानं गर्जना करीत होता. सगळे रस्ते समुद्रतीरी जाण्याचे रस्ते झाले होते. कामगारांची प्रयत्नशक्ती वहात होती. समुद्रतीरी माणसांचा एक समुद्र बनला होता. तो खऱ्या समुद्रापेक्षाही विशाल आणि अगाध होता.

ॲना अंगणात उभी होती. आज बऱ्याच घटना घडणार आहेत हे तिला माहीत होतं. आणि त्या घटनांमागं आपल्या दोन्ही भावांचा हात आहे हेही तिला माहीत होतं. आणि तो दुबळा ? केवळ त्याच्याबाबतीत तिला काही माहीत नव्हतं.

वेलायुधनच्या आईनं रस्त्यावरून हाक मारून तिला विचारलं, "चौपाटी-वर येतेस ना ?"

"हो. मी आलेच." तिनं घाईघाईनं झोपडीचं दार लावलं आणि रस्त्यावरून धावत सुटली.

त्या दोघी भरभर चालल्या होत्या. वेलायुधनची आई म्हणाली, "पिसाळ-लेल्या कुत्र्यांसारखे शिपाई हिंडत आहेत !"

"असे का बरं हिंडताहेत ?"

"त्यांना असं वाटतंय की कदाचित दंगल होईल."

"दंगल करणार कोण ?"

"कामगार."

"का ?"

"आम्ही असं म्हणत आहोत की शासनाचा अधिकार आम्हाला मिळाला पाहिजे."

"पण त्यांना ते मान्य आहे का ?"

"नाही. म्हणून तर हे भांडण चालू आहे."

अंधार पसरू लागला. त्या दोघी रस्त्याच्या एका बाजूनं चालल्या होत्या. चौकात उभ्या असलेल्या एका पोलिसानं ॲनाला विचारलं, "तू रोक्कीची बहीण ना ?"

ॲनानं काहीच उत्तर दिलं नाही. तिनं हळूच त्याच्याकडं पाहिलं आणि तिला आश्चर्य वाटलं. काही दिवसांपूर्वी तिला पकडायला आलेला हाच पोलीस होता. त्या पोलिसानं दुसऱ्या पोलिसाला विचारलं, "तुझ्या ओळखीची आहे वाटतं?"

"हो."

"चांगली आहे का रे ?"

"आपल्याला काय करायचंय, कशी का असेना !"

ॲनाचा हात धरून वेलायुधनची आई भरभर चालू लागली. पोलीस आपल्या मित्राला म्हणत होता, "चल. आपण तिचा पाठलाग करू. आपल्याला ती मिळेल."

वेलायुधनच्या आईनं ॲनाला विचारलं, "काय ग ? तुला माहीत आहे वाटतं तो ?"

"हो. एका रात्री तो मला पकडायला आला होता."

"मग पकडलं का ?"

"नाही पकडलं. 'हवा'नं मला वाचवलं."

"हवाच सगळा गोंधळ करतो. त्यानंच माझ्या मुलाला मारवलं !"

"आँ !"

समुद्रानं किनाऱ्यावर आक्रमण करावं त्याप्रमाणं प्रचंड आवाज अचानक त्यांच्या कानावर येऊन आदळला. जणू काही वाघ, सिंह, हत्ती सर्वजण मिळून गर्जनाच करीत आहेत.

रडणं ! मृत्यूचं रडणं आणि ओरडणं ! काहीतरी नष्ट होत होतं, फुटत होतं, तुटत होतं !

प्रचंड आवाज ! प्रचंड आवाज !

ॲनाचा हात धरून वेलायुधनची आई रस्त्याच्या कडेला उभी होती. आणि ॲना वेड्यासारखं बडबडत होती--

"माझ्या दोन्ही भावांना त्यांनी मारलं का ? मारलं ?"

वेलायुधनच्या आईचा हात सोडून पळण्याचा ती प्रयत्न करू लागली. वेलायुधनच्या आईनं तिचा हात घट्ट धरला. आणि तिला म्हटलं, "जाऊ नको पोरी, जाऊ नको."

खूप लोक यायला लागले होते. वेलायुधनच्या आईनं ॲनाला रस्त्याच्या एका बाजूला ओढलं.

दहा वीस माणसं मरणाच्या भयानं पुढं धावत येत होती. त्यातला एक रस्त्यात पडला. दुसरे त्याला उठवायला धावले.

"रक्त ! रक्त ! रक्त वहातंय पाहिलंस ?" ॲनानं विचारलं.

"गप बस. माझ्याबरोबर चल."

त्या दोघी भराभर चालू लागल्या. लाकडी पुलावरून त्यांनी नाला पार केला.

'ठो ! ठो ! ठो !'

आकाशात त्या आवाजाचा प्रतिध्वनी उमटला.

"बहुतेक गोळीबार झाला." वेलायुधनची आई म्हणाली.

"सगळ्यांना मारत आहेत !" ॲना उद्गारली.

"चल" वेलायुधनच्या आईनं ॲनाचा हात पकडला व दोघी पळत सुटल्या. त्यावेळी सुद्धा गोळीबाराचा आवाज आकाशात घुमत होता.

  

मध्यरात्र झाली. भयानक शांततेत शहर बुडून गेलं. जोरानं जाणाऱ्या सैनिकी गाड्या आणि त्यांचे हॉर्न त्या शांततेचा भंग करीत होते. ॲना एकटीच अंगणात उभी होती. तिला असं वाटलं की रस्त्यातून कोणीतरी चालत येत आहे. तिनं लक्षपूर्वक ऐकलं आणि विचारलं, "कोण आहे ते ?"

"मी आहे." असं म्हणत रोक्कि अंगणात आला.

"दादा कुठाय् ?"

"आँ ?"

"दादाला पाहिलं नाहीस ?"

"नाही !" कमरेला खोचलेली काड्यापेटी काढीत तो म्हणाला, "जा. दोन तीन आगकाड्या घेऊन ये."

"आत्ता कशाला आगकाडी ?"

"विडी पेटवायला."

"भाऊ, तुला जेवायचं आहे की नाही ?"

"आगकाडी आण—" त्यानं हुकूम केला.

ॲना आत गेली आणि आगकाडी घेऊन आली. रोक्कीनं तिच्याजवळची आगकाडी घेतली आणि तो निघून गेला. तशी ॲनानं त्याला विचारलं, "आता तू कुठं चाललास ?"

काहीच उत्तर आलं नाही. रोक्कि अंधारात नाहीसा झाला.

ॲना ओसरीवर जाऊन बसली. पुन्हा पावलांचा आवाज आला. ॲना उठून अंगणात गेली.

अंतोणी अंगणात येऊन उभा राहिला. तसं ॲनानं विचारलं, 'कोण दादा का ?'

"हो—पण तू अंगणात का आलीस ?"

"तुझीच वाट पहात होते."

"रोक्कि आला का ?"

"आला आणि आगकाडी घेऊन आत्ताच गेला."

"त्याला आत्ता कशाला आगकाडी हवी होती ?"

"तो म्हणत होता विडी पेटवायला."

"पण तो कुठं विडी ओढतो ?" अंतोणी विचारात पडला. मग त्यानं विचारलं, "हवा आला होता का ?"

"नाही."

थोड्या दूर अंतरावर उजेड दिसू लागला आणि तो प्रकाश दरक्षणी वेगानं वाढू लागला. मग लक्षात आलं की आगडोंब उसळला आहे !

"अरेरे ! त्यानं घात केला." अंतोणीनं डोक्यावर हात मारून घेतला.

उद्विग्न होऊन अॅनानं विचारलं, "दादा, काय झालं ?"

"त्यानं ......त्यानं कारखान्याला आग लावली."

त्यानंतर बोलण्याचे, हाका मारण्याचे, ओरडण्याचे सारखे आवाज ऐकू येऊ लागले. आणि मग सैनिकी गाड्यांच्या हॉर्नच्या आवाजानं देखील त्या आवाजात आणखी भर टाकली.

रस्त्यावरून कित्येक व्यक्ती पळाल्यासारखं वाटलं. मग पुष्कळांचा ओरडण्याचा आवाज आणि शेवटी किंकाळी !

"छोटा भाऊ—छोटा भाऊच ओरडतो आहे !" अॅना रस्त्यावर धावली.

अंतोणीनं तिला थांबवली आणि घरात नेली. मग त्यानं दार बाहेरून घट्ट लावून घेतलं आणि तो बाहेर पडला. त्यांच्या पावलांच्या आवाजावरून अॅनानं ओळखलं की तो रस्त्यावरून धावतो आहे !

आरडाओरडा आणि किंकाळ्या लांबून कितीतरी वेळ ऐकू येत होत्या. शेवटी सगळं शांत झालं. अॅना घराच्या दाराशी कान लावून उभी होती. तेवढ्यात अंगणात पावलं वाजली. अॅनानं धीर करून विचारलं, "कोण ? दादा ?"

"हं."

कोणीतरी ओसरीवर आलं आणि झोपडीचं दार उघडलं गेलं. अॅना लगेच दिवा घेऊन पुढं झाली.

झोपडीचं दार उघडलं गेलं आणि खाकी पोशाख पाहिल्यावर अॅना एकदम मागं सरली. एक लोखंडी हात तिच्या खांद्यावर पडला.

"आई ग !" ती खूप मोठ्यानं ओरडली.

एकदम कुणीतरी आत घुसलं. एक किंकाळी आणि एक प्रहार !

खाकी पोशाखातल्यानं मागं वळून पाहिलं— त्या दुबळ्यानं सुरी घेतलेला आपला हात उंच केला होता. खाकीनं त्याच्या हातावर एक थप्पड मारून त्याच्या हातातली सुरी खाली पाडली आणि मग आपल्या लोखंडी हातानं त्यानं त्या दुबळ्याच्या अंगावर अनेक प्रहार केले.

मग त्यानं त्या दुबळ्याला दार बांधायच्या दोरीनं घट्ट बांधलं. एवढ्यात दिवा विझला. ॲना गोंधळली. दुबळा मोठ्यानं ओरडला. आणि ॲनानं किंकाळी फोडली.

'ओ मसीहा' ॲना दीनवाणीनं म्हणू लागली.

पुन्हा आरडाओरडा आणि कण्हण्याचा आवाज.

झोपडीला धरून ठेवणारा मधला बांबूचा खांब त्या मारामारीमुळं मोडून पडला. आणि छप्पर खाली आलं. मग मोठ्या आवाजातील एक शब्द !

'ओ मसीहा.'